महाकवि शेक्सपियर यानें केलेल्या
अथेल्लो नाटकाची रंगावृत्ति.

देवलकृत

# झुंजारराव

नाटक.

किंमत १२ आणे

पुण्यपत्तनस्थ

माजी आर्योद्धारक मंडळीच्या

संस्मरणार्थ

हें नाटक मीं अत्यंत प्रेमादरपूर्वक

अर्पण केलें आहे.

गोविंद बल्लाळ देव

भाषांतरकर्ता

# प्रस्तावना.

जसें कालिदासाचें 'शाकुंतल,' किंवा भवभूतीचें 'उत्तररामचरित' तसेंच शेक्सपियरचें 'अथेल्लो' नाटक हें त्याच्या परिपक्वबुद्धीचें फल होय. याची प्रशंसा करावी तितकी थोडीच. या नाटकाचें कै० महादेवशास्त्री कोल्हटकर यांनीं केलेलें एक मराठी भाषांतर प्रसिद्ध झालेलें आहे. पण तें केवळ भाषांतर याच दृष्टीनें तयार झालें असल्यामुळें त्याजवरून रंगभूमीवर प्रयोग करतांना पुष्कळ अडचणी येत असत. दहा वर्षांपूर्वी पुणें येथील **आर्योद्धारक** मंडळीनें जेव्हां हा प्रयोग केला, तेव्हां त्या अडचणी त्यांच्या अनुभवास आल्या, व मीही त्याच मंडळींतला असल्याकारणानें माझें त्यांजकडे सहजच लक्ष्य गेलें. म्हणून नाटकप्रयोगास, व त्याचप्रमाणें वाचनासही, सर्वांशीं उपयोगीं पडेल अशी या नाटकाची एखादी रंगावृत्ति ( Stage-edition ) काढावी असें माझ्या मनांत येऊन त्याप्रमाणें मीं ही यथामति तयार केली आहे. पूर्वीं प्रसिद्ध असलेल्या भाषांतरापेक्षां हींत विशेष गोष्टी ह्याच, कीं निष्कारण शब्दविस्तार बहुतेक कमी केला आहे; इंग्रजी तऱ्हेची वाक्यरचना न करितां भाषणांचा झोंक कालास व पात्रांस साजेल असा ठेवला आहे; जागजागीं पात्रसूचना दिल्या आहेत; व मूळ नाटकांतील पात्रांचीं केवळ नांवेंच बदललीं नसून एकंदर संविधानकही मूळांतलें सौरस्य व रहस्य बिलकुल कमी होऊं न देतां इकडील एका ऐतिहासिक स्थितीशीं जितकें जुळेल तितकें जुळविलें आहे. हा सर्व फेरफार मार्मिक प्रेक्षकांच्या किंवा रसिक वाचकांच्या लक्ष्यांत तेव्हांच येईल, याकरितां त्याजबद्दल येथें विशेष विस्तार करीत नाहीं. इतकें करूनही यांत कांहीं दोष राहिले असतील तर त्याजबद्दल विद्वज्जनांनीं मला क्षमा करून माझ्या इतर कृतींप्रमाणेंच हिचाही प्रेमानें स्वीकार करावा अशी प्रार्थना आहे.

ही रंगावृत्ति तयार करितांना माझे विद्वान मित्र प्रो० **वासुदेव बाळकृष्ण केळकर** यांनीं मला चांगलें साहाय्य केलें, त्याजबद्दल

त्यांचा मी फार आभारी आहें. त्याचप्रमाणें वऱ्हाडांतल्या शाळाखात्यांतील एज्युकेशनल इन्स्पेक्टर रा० सा० **विष्णु मोरेश्वर महाजनी**, एम्. ए., यांनीं आपला बहुमोल वेळ खर्चून या पुस्तकाची हस्तलिखित प्रत फार मार्मिकपणानें तपासली व कांहीं महत्त्वाच्या सूचना केल्या, यासाठीं त्यांचाही मी फार आभारी आहें. तसेंच माझे मित्र रा० **अनंत वामन बरवे** यांनीं हें पुस्तक छापतांना शुद्धाशुद्ध पाहण्याचे श्रम घेतल्याबद्दल त्यांचेही आभार मानून ही प्रस्तावना पूर्ण करितों.

ता० २ नोवेंबर, सन १८९०
इसवी; पुणें, पेठकाळेवावर,
भिडे यांचा वाडा.

गोविंद बल्लाळ देवल.

---

## आवृत्ति दुसरी.

या पुस्तकाच्या पहिल्या आवृत्तीच्या सर्व प्रती खपल्यामुळें, पहिल्या आवृत्तीबरहुकूम ही आवृत्ति छापिली आहे.

मु० मुंबई, ता० ९, माहे
जुलई, सन १८९९.

गोविंद बल्लाळ देवल.

# नाटकपात्रें व स्थळें.

**ड्यूक आफ् वेनिस**—वेणीपूरचा राजा.
**अथेल्लो**—झुंजारराव ( सरलष्कर. )
**कयाशिओ**—पिलाजीराव ( झुंजाररावाचा मुतालिक. )
**यागो**—जाधवराव ( झुंजाररावाचा निशाणवाला. )
**ब्रोब्यांशिओ**—मानाजीराव ( एक वृद्ध सरदार. )
**ग्राशियानो**—मुधोजीराव ( मानाजीचा भाऊ. )
**लोडोविको**—धनाजीराव ( एक मानकरी. )
**रॉडरिगो**—रंभाजीराव ( एक सधन तरुण गृहस्थ. )
**मॉटेनो**—परसोजीराव ( सोनबेटाचा अधिकारी. )
**ऍंटोनिओ**—हिम्मतराव.
**जूलिओ**—हैमती ( हुजऱ्या. )
**डेस्डिमोना**—कमळजा ( झुंजाररावाची बायको, मानाजीची मुलगी. )
**एमिलिया**—सारजा ( जाधवरावाची बायको. )
**बयांका**—चंपाजी ( पिलाजीची राख. )
**सायप्रस**—सोनबेट.
**ऱ्होड्स**—लोहबेट.
यांशिवाय कानाजी, नोकर, कामदार वगैरे.

# झुंजारराव नाटक.

## अंक १ ला.

**प्रवेश पहिला—वेणीपुरांतील एक रस्ता. रात्र.**

( पुढें **रंभाजीराव** व त्याचेमागून **जाधवराव** असे येतात. )

**रंभाजी०**—( रागानें ) चला! बोलूं नका. माझ्याशीं दगलबाजी केलीत. अहो! आजपर्यंत माझा पैसा आपलाच समजून पाहिजे तसा उधळलात. आणि तुम्हाला ही बातमी लागली असून,—

**जाधव०**—पण -अहो पण -ऐकून तर घ्या मी काय ह्मणतो तें. तुमची शपथ. मला या गोष्टीचें स्वप्न सुद्धां नाहीं.

**रंभाजी०** —तुम्हीं सांगितलेंत. त्याच्यावर माझा दांत आहे.

**जाधव०** मग? आहेच. नाहीं कोण ह्मणतो आणि त्याचें कारणही सांगतो. त्यानें मला आपली मुतालिकी दिली. ह्मणून इथल्या दोन तीन नव्या मान कऱ्यांना समक्ष जाऊन त्यांच्याजवळ शब्द टाकला. शिवाय, माझ्या लायकीप्रमाणें तो हुद्दा मलाच मिळणार. पण, तो आपल्यास ऐकेल! त्याला कोणाची गरज! बस्स! स्वतांची नवीन लागेल तसें करायचें. ह्मणून त्यानें प्रथम लष्करी भाषणाची हत्तीवरील गर्दी उडवून त्या मानकऱ्यांची लांबलचक चऱ्हाट लावून उड-

वाडवीत केली. आणि हें काय? अखेर नक्षा! ह्मणतां कसं, "आम्हाला हुद्दार नेमायचा तो नेमून चुकलों." झालं! बरं, नेमला तो तरी कोण? तो पिला-जी—एका पागेवर आपक आला आहे तो, लढाईचं मैदान सुद्धां कधीं पाहिलं नसेल बिचाऱ्यानं! कुठं लढा-ईच्या बाता मारतांना ऐकल्या असतील, त्यांच्या जोरावर भपकेदार पोशाख चढवून शिपाईगिरीचा बखवा करण्यांत मात्र बहाद्दर! पण कसंहीं असो. आम्हाला कोपऱ्यांत दडपून मुतालीक नेत आले, आणि कित्येक निकराच्या मामल्यांत त्या अंजारगावानं आमची कर्तबगारी जातीनं पाहिली असून, आम्ही आपले निशाणवाले ते निशाणवालेच!

रंभाजी०—तुम्ही म्हणून स्वस्थ बसलांत. मी असतो तर त्याला छाटूनच टाकला असता.

जाधव० - पण करणार कसं! ताबेदारींचं कामच हे. मध्यां बढती मिळायची, ह्मणजे एक शिफारस, किंवा मेहरबानी. पहिल्याच्या मागून दुसऱ्याचा हक्क, हा मामूल आतां बुडाला. असो; पण या सर्वांवरून तुम्हीच सांगा कीं, त्या अंजारगावाविषयीं माझं मन सफा असावं, असा कांहीं खरा संबंध राहिला आहे का आतां?

रंभाजी०—मग त्याची ताबेदारी का करतां?

जाधव०—हं, सांगतों. (त्याला बाजूला घेऊन हळूच) त्याच्यावर डावपेंच चालवून आपला मतलब साधून घ्यावा, म्हणून त्याची ताबेदारी करतों, समजलांत? आम्हां सर्वा-नाच कांहीं धनी होतां येत नाहीं! आणि सर्वच धन्यांना इमानीच नोकर मिळतात असें नाहीं. नोकर दोन प्रकारचे.

कांहीं असे इमानी आणि असे हांजीहाजीखोर असतात, कीं केवळ पोटासाठीं, धन्याच्या घरीं शुद्ध गाढवाप्रमाणें, मोठ्या हौसेनं वर्षानुवर्षे राबतात. पण म्हातारपण आलें कीं हकालपट्टी! अशा गद्धेपंचविशी करणाऱ्या गुलामांना, मी तर म्हणतों, की मार चाबकानंच झोडपावेत. आतां, दुसरे कांहीं असेही असतात कीं, बाहेरून आपल्या नोकरीचा पेशा चांगला राखायचा; पण आपलें सगळें लक्ष मतलबावर; आणि वरवर इमान दाखवून, आपली एकदां तुमडी भरली, कीं ठोकला रामराम धनीसाहेबांना! अशा मर्दात कांहीं पाणी असतं; आणि माझा बाणा हाच आहे. तेव्हां समजलांत, मी त्याची ताबेदारी फक्त मतलब साधावा म्हणून करतों. ईश्वरसाक्ष सांगतों, त्याच्यावर माझं प्रेम नाहीं, कीं भक्ति नाहीं. पण ही मी बाहेरून दाखवायची. मी बाहेर वेगळा आणि आंत वेगळा.

रंभाजी०—त्याला जर हा शिकार पचली, तर त्याचें नशीब पुरं खुललं म्हणायचं!

जाधव०—तिच्या बापाला उठवा. लागा पाठीस. मोठ्या आनंदांत निजला असेल. अशांत घा लावून भुंगा. हरतऱ्हेनं त्याला चिथवा, बघता काय?

रंभाजी०—हाच त्याचा वाडा, मारतों हाका जोरानं

जाधव०—(त्याला पुढे करून) हं; पण भरवस्तीच्या शहरांत रात्रीची एकाएकीं आग भडकलेली पाहून जशा घाबरून आरोळ्या ठोकतात, तशा मारा.

रंभाजी०—मानाजीराव! अहो मानाजीराव!

जाधव०—(ओरडून) उठाहो! अहो मानाजीराव!

चोर! चोर! चोर! आपली मुलगी! पैसाअडका पहाहो! (हाथे मिडून) चोर! चोरहो!

मानाजी०—(खिडकींशीं येऊन) काय आहे दंगा? कां असे कां ओरडतां?

रंभाजी०—आपल्या घरचीं सर्व माणसं आतच आहेत का?

माधव०—आपले दरवाजे कुलुपबंद आहेत का?

मानाजी०—का बरं? तुम्ही कोण चौकशी करणार?

माधव०—महाराज, आपल्याला मला लुटलं. तुमचा काळिजा कापून अर्धा प्राण चोरून नेला. आतां, इतक्यांत म्हणून सांगतों, चार माणसं शिपाईप्यादे जमवा, दौड करा, नाहीं तर काळ्या ओटिगाचे सामेरे व्हाल. म्हणून सांगतों, उठा लौकर.

मानाजी०—तुम्ही शुद्धीवर नाहीं वाटतं?

रंभाजी०—महाराज! माझा शब्द आपण ओळखला का? मी रंभाजीराव.

मानाजी० तूं का? तर अगोदर चालता हो. समजलों माझ्या मुलीला तूं मागणी केली होतीस, ती मीं नाकारली; म्हणून दारूच्या निशेंत धुंद होऊन, आकसानें मला त्रास द्यायला इथें आलास वाटतं? चल निघ इथून.

रंभाजी०—पण—अगोदर—

मानाजी०—नाहीं तर चांगला वचपा काढीन, समजलास.

रंभाजी०—पण मी काय म्हणतों ऐकून तर घ्या.

मानाजी०—तूं लुटीची काय गोष्ट बोलतोस? ही

कांहीं वेबंद नगरी नव्हे; वेणीपूर आहे हें. आणि माझा वाडा म्हणजे रानांतलं खोपट नाहीं, समजलास?

जाधव०—वा ! काय चमत्कारिक आहां हो ! आम्ही तुम्हाला वेळेवर खबर द्यायला आलों, आणि तुम्हीच आम्हाला दडपतां !

मानाजी०—खबर ! कसलीरे खबर देणार तुम्ही ?

जाधव०—हीच कीं, तुमची मुलगी, आणि तो लुच्चा अंगारराव, आणि यांत काय तें समजून घ्या.

मानाजी०—तूं पाजी हरामखोर मनुष्य आहेस.

जाधव०—आपण अहां महाराज सरदार लोक !

रंभाजी०—मामासाहेब, मी सांगतों इकडे लक्ष द्या. आपली मुलगी, अशा अपरात्रीं, बरोबर घरचा कुणी भला बुरा मनुष्य न घेतां, त्या अंगाररावावर फिदा होऊन, त्याच्याकडे गेली; या गोष्टीला कदाचित आपला रुकार असेल, तर आम्ही कळवायला आलों, हा आमच्या हातून मोठा गुन्हा झाला; परंतु आपल्या नकळत गेली असेल, तर मात्र आपण आम्हाला विनाकारण शिव्या हासडल्यात. आपल्यासारख्या थोरांची आम्ही भलतीच थट्टा करूं कशी ? अजून संशय असेल तर खात्री करून घ्या. ती जर घरांत सांपडली, तर आपल्याला फसविल्याबद्दल होईल ती शिक्षा भोगायला मी तयार आहे.

मानाजी०—कोण आहेरे, कंदील लावा. माणसांना उठवा सगळ्या. आतां स्वप्न पडलं होतं, त्याला हें जुळतें. कंदील ! कंदील ! ( जातो. )

जाधव०—रंभाजीराव, आतां मला गेलंच पाहिजे. कारण इथं राहिलों तर अंगाररावाविरुद्ध साक्ष द्यावी

लागणार. तें रास्त नाहीं. उगीच नोकरीला धक्का बसण्याचा संभव. कारण या प्रकरणांत सरकारचा त्याच्यावर गुस्सा होईल; पण त्याचा हुद्दा कांहीं निश्चित नाहीं; कारण तिकडे लढाई जुंपली आहे. तिच्यावर पाठवायला याच्या तोलाचा हुशार शिपाई, सरकारांनीं आपले प्राण गहाण ठेवले तरी, दुसरा मिळणं नाहीं. तेव्हां अर्थात्, तो माझा दुष्मान् आहे तरी, या पोटासाठीं मला त्याच्यापुढें निशाण फडकावून नेकी दाखविलीच पाहिजे. असो, ही जमात घेऊन तुम्ही बल्लभीमनकट्यावर या. तिथं सांपडेल तो. मी जवळ आहेंच. रामराम ! (पळून जातो.)

**मानाजी०**—आला-घात आला ! अरिष्ट कोसळलं खरं ! गेली कारटी ! आतां नशिबा दुःखावांचून कांहीं नाहीं. कांहो रंभाजीराव, तुम्हीं कुठे पाहिलीत तिला ? गुंजाररावाकडे गेली म्हणतां ? पण तीच होती कशावरून ? अशीं पोरं नसलेलीं बरीं ! देवा ! बाहेर तरी कशी पडली ती ! बापाला ठकविलंस ! बाबांनो ! याउपर पोरीच्या वागणुकीवरून त्यांच्यावर भरंवसा ठेवूं नका बरं ! पण अशा अल्लड मुलींच्या मनावर चेटमंत्रांनीं भुरळ पडलेली, तुम्हीं नाहींका कधीं ऐकली ?

**रंभाजी०**—हो. हो. अशा पुष्कळ गोष्टी ऐकल्या आहेत.

**मानाजी०**—रंभाजीराव, ती मीं तुम्हाला दिली असती तरी बरं झालं असतं. पण आतां तो चोर आणि ती कारटी आपल्याला कुठं सांपडतील बरं ?

**रंभाजी०**—चांगले हत्यारबंद जवान घेऊन माझ्याबरोबर याल, तर मी काढीन त्यांचा पत्ता.

मानाजी०—हा मी तयार आहें, चला. ( जातात )

प्रवेश दुसरा- वल्लभीमतल्यावरील रस्ता-

( झुंजारराव व जाधवराव येतात )

जाधव०—शिवाप्याच्या पैशानें माझ्या हातून लढा-ईत पुष्कळ बळी पडले आहेत; तरी मुद्दाम एखाद्याचा खून करणं ह्मणजे घोर पातक असं मी समजतो. अशा धार्मिकपणानं कधीं कधीं मला नुकसानसुद्धां होतं. आठ दहा वेळ मनांत आलं, कीं ही समशेर अशी त्याच्या पोटांत खोसकून द्यावी.

झुंजार०—नाहीं खोसकलीत, हेंच चागलं केलंत.

जाधव०—असं नव्हे समजलांत. पण त्यानं आप ल्यावर असं तोंड सोडलं होतं कीं, माझ्यांत तितका साधुपणा नसल्यामुळं तें मीं मोठ्या मुष्किलीनं सहन केलं. परंतु आपल्याला एक विनंती आहे. आपला हा प्रीति-संबंध शास्त्राबहुकूम झाला आहेना? कारण मानाजीराव मोठा लोकप्रिय असून, दरबारांतही चांगला वजनदार आहे. तेव्हां जातकुळीची ह्मणा किंवा दुसरी काहीतरी भानगड उत्पन्न करून, आपल्याला एखाद्या पेचांत आणील, ह्मणून ह्मणतों.

झुंजार०—अं! पाहिजे ती भानगड करूं द्या. मीं ज्या आजपर्यंत सरकारच्या मोठमोठ्या कामगिऱ्या बजा-वल्या आहेत, त्यांच्यापुढें त्याच्या रडण्याचं काय चालणार? शिवाय जातकुळीबद्दल म्हणाल, तर तुह्माला ह्मणून सांगतों, मी जरी जातीचा कोळी, तरी कांहीं हलका नाहीं सरदा-राचा बच्चा आहें. पण आपलीच बढाई सांगणं रास्त

नव्हे, म्हणून ही गोष्ट मी झपवून ठेवली होती, समजलांत? तसंच आज जो मी एवढ्या हुद्यावर चढलो आहें, तो तरी फक्त आंगच्या जोरावर चढलो. उंच कुळानला म्हणून नाहीं. जाधवराव, कमळजा माझ्या मनांत उतरली नसती, तर जगांतलें सर्व रत्नभांडार आंदण घेऊन सुद्धां मी आपल्या पायांत हा संसाराचा डोंगर कधींही अडकविला नसता. पण तो उतेड कमला दिसतो बरं!

जाधव०— -हाच तो तिचा बाप. धर्मासाहेब, आपण आत जाल तर बरं होईल.

शृंगार०—( पुढें सरून ) कां? मला काय त्याची डर? माझा हुद्दा, माझं शौर्य, आणि निष्पाप मन, याचा जोर असून मी आंत कां जाईन? पण तोच का हा?

जाधव०— मला वाटतं नव्हे. तो नव्हे.

शृंगार०--अहो हे आपले मुनालिक पिलाजीराव.

( पिलाजीराव व कांहीं शिपाई येऊन रामराम करितात. )

कां, काय खबर?

पिलाजी०--सरकारांनीं आपल्याला या क्षणीं ताब-डतोब बोलवलं आहे.

शृंगार०--कां बरं?

पिलाजी० —माझा तर्क-मोगलराज्याकडील कांहीं जरूरीचं प्रकरण असावं. कारण आतां-रात्रीच्यारात्रीं तिकडून लागोपाठ बारा सांडणीस्वार आले. बहुतेक ममलतगार खलबतखान्यांत जमले आहेत. व आपलाही चोहोंकडे शोध चालला आहे.

शृंगार०— ठीक आहे. असाच उभाउभीं आंत जाऊन येतों. ( जातो. )

पिलाजी०—का जाधवराव, हे इकडे कुणीकडे?

जाधव०—(हसून) अहो काय विचारता! आज स्वारीच्या हातीं एक चाळीसतोळ्यांची सोन्याची खाण लागली आहे ना! ती जर पचली, तर जन्माची चंगळ झाली.

पिलाजी०—म्हणजे? मी नाहीं समजलों.

जाधव०—अहो त्यांनीं एक बायको पटकावली!

पिलाजी०—ती कोण?

जाधव०—ती—(झुंजारराव येतो) कां निघायचं ना धनीसाहेब?

झुंजार०—चला.

पिलाजी०—ही पाहिली, आपल्या शोभेला दुसरी मंडळी आली.

जाधव०—(घाबऱ्या आवाजानें) धनीसाहेब, हा मानाजीराव-संभाळा, प्रसंग बिकट दिसतो.

(मानाजीराव, संभाजीराव व कांहीं जवान येतात.)

झुंजार०—कोण आहे? उभे रहा.

संभाजी०—मामासाहेब, हाच तो झुंजारराव.

मानाजी०—धरा, पकडा चोराला. बघतां काय?

(दोहोकडच्या तलवारी चमकतात.)

जाधव०—या संभाजीराव, ही तलवार तुमच्याकरताच उपसली आहे.

झुंजार०—हां! तलवारी उपसायचं कारण नाहीं. मामासाहेब, आपल्या वयाला जेवढा आम्ही मान देऊं, तेवढा आपल्या हत्यारांना देणार नाहीं.

मानाजी०—चोरा! हरामखोरा! माझी मुलगी

कुठें नेऊन ठेवलीस बोल' कांहीं तरी चेष्टा करून तूं तिला पुरून टाकलीस. नाहीतर तुझ्यासारख्या कमअस्सल माकडाला मी आपखुषीनें, प्रत्यक्ष बापाला न विचारितां कधींही माळली नसती. बघतां काय? पकडा. आवळा चोराला. इकडेतिकडे करील तर चांगला नरम आणा. अरे हरामखोरा! पकडा, पकडा.

(दोन चार भृत्य लोक झुंजाररावर धावतात.)

**झुंजार०**—खबरदार! हातच ईजा येण्याची तुम्हांला आणि (आलेल्या लोकांस) तुम्हांला दोघांनाही जरूर नाहीं. (गंभीरपणानें) मामासाहेब, तुमच्याबरोबर मी कुणीकडे येऊं तें बोला.

**मानाजी०**—बंदिखान्यांत, दुसरें कुठें? सरकारची कशी मर्जी होइ तोंपर्यंत, तेथें कोंडून राहिलें पाहिजे.

**झुंजार०**—पण मला तावडतोब खुद्द सरकारच्या भेटीला गेलें पाहिजे. कांहीं जरूरीच्या कामाकरितां हे पिलाजीराव त्यांच्या हुकुमानें मला न्यायला आले आहेत.

**पिलाजी०**—होय मामासाहेब—सरकार खलबतखान्यांत बसले आहेत. आपल्याकडेही जासूद गेला आहे.

**मानाजी०**—काय! सरकार इतक्या रात्रींचे खल-बतखान्यांत! कांहीं हरकत नाहीं. याला घेऊनच तिकडे जाऊं. सरकारांना तरी या गोष्टीची दाद घेतलीच पाहिजे. कारण, असा जुलूम जर लोकांवर खुशाल होऊं दिला, तर औरंगबादशाहीच सुरू झाली म्हणायची. चला रे. (सर्व जातात.)

## प्रवेश तिसरा. राजवाड्यांतील खलबतखाना.

( राजा व दोघे चार तीन मसलतगार )

**राजा**—या सर्व बातम्या खऱ्या म्हणाल्या, तर त्यांच्यांत कांहीं मेळ दिसत नाहीं.

**१ मसलतगार**—खरं आहे महाराज.

**२ मसलत०**—सरकार, अंदाज म्हणजे थोडाबहुत तफावत असायचीच. परंतु, हबशाचं आरमार सोनबेटावर चालून येणार, हें या बातम्यांवरून खास ठरतं.

**राजा**—हा एकंदरीत हेंच खरं दिसतं.

( इतक्यांत एक जासूद येऊन मुजरा करून उभा राहतो. )

**राजा**—काय खबर ?

**जासूद**—हबशी आरमार लोहबेटावर जाणार, ही खबर हुजूर जाहीर करायला मला युवराजांनी पाठविलं आहे.

**राजा**—मसलतगारांस कां ! यावर काय तर्क चालतो ?

**१ मसलत०**—ही खबर खरी आहे सरकार. फक्त आमची चकमूल करण्यासाठीं त्यांचा हा खेळ दिसतो. कारण, हबशाला सोनबेटाची जरूर विशेष. शिवाय, सरकारच्या हेंही ध्यानांत येईल कीं, लोहबेटापेक्षां सोनबेट काबीज करायलाही इतकं जड जायचं नाहीं. कारण तिथली बंदोबस्ती जरा ढिली आहे. तेव्हां, हबशी सोनबेट सोडून लोहबेटावर हल्ला करून गैरकायदा भांडत राहील, इतका कांहीं कच्चा दिसत नाहीं.

( एक जासूद येऊन मुजरा करून उभा राहतो. )

**राजा**—कांहीं नवी बातमी ?

कडे पाहायलासुद्धां ती भीत असे. ते कांहीं नाहीं. मी अगदीं प्रतिज्ञेवर सांगतों, कीं यानें कांहीं जबरदस्त दवा, किंवा भारलेलें पाणी देऊन, तिला भ्रमिष्ट करून टाकली.

**राजा**—प्रतिज्ञेवर सांगणं हा कांहीं पुरावा नव्हे. पुराव्याला चांगलीं स्पष्ट अशीं प्रमाणंच पाहिजेत. उगीच पोकळ करणाना काय उपयोगाच्या. झुंजारराव, विचारतों याचा जाब द्या. तुम्ही जादूटोणा, जुलूमजबरी करून तिला हस्तगत केलीत, किंवा तुमचीं परस्पर मनं जमून सरळ मार्गानें हा संबंध जुळला? सांगा पाहूं.

**झुंजार॰** विद्यावंतांनीं तिलाच इथें आणवून, यांच्या समक्ष सर्व हकीगत विचारावी. तिच्या सांगण्यांत जर माझी कांहीं हरामखोरी आपल्याला दिसली तर माझा हुद्दा काढून घ्यावा. इतकेंच नाहीं तर, माझी गर्दन छाटली तरी मी राजी आहे सरकार.

**राजा**—ठीक आहे. आणवा तिला.

**झुंजार॰** जामदार, तुम्हीच तिला घेऊन या, आणि ती येईपर्यंत तिच्या माझ्या लग्नाची सारी हकीगत मी हुजुराच्या कानावर घालतों. ( जामदार जातो. )

**राजा**—सांगा पाहूं.

**झुंजार॰** ( मानाजीस उद्देशून ) यांना माझ्यावर फार लोभ. म्हणून हे मला वरचेवर घरीं बोलावून, लढाया, वेढे, तसेंच माझ्यावर गुजरलेल्या अत्याचारिक प्रसंगांची हकीगत पुन्हा पुन्हा विचारीत, आणि मीही माझ्या लहानपणापासून यांनां विचारल्या घटकेपर्यंत घडलेल्या सर्व गोष्टींचा पाढा वाचीत असें. त्यांत मुख्यत्वेंकरून दैवानें मला दिलेले गोते, दर्यांत रणमैदानांत येऊन पडलेले दु-

थेर प्रसंग, किल्ला सर करतांना तटाच्या भगदाडांत बेशर्थ प्राण बचावणं, सर्व शत्रूंच्या हातीं लागणं, त्यांतून निसटून जाणं; तसंच मी प्रवासांत पाहिलेल्या मोठमोठ्या खाणी, सडक, अस्मान फोडून जाणारे उंच उंच पहाड; त्याचप्रमाणं भयंकर गुहा, ओसाड मैदानं, विजातीय मनुष्यभक्षक राक्षसी माणसं यांचं मी वर्णन करीत असें. या गोष्टी ऐकायला याची मुलगीही मधूनमधून येऊन बसे. तिची फार उत्कंठा पाहून, एके दिवशीं तिनं एकटीनं माझी सर्व हकीगत ऐकावी, असा घाट मी जुळवून आणला. सर्व हकीगत ऐकल्यावर तिला अतिशय दुःख झालं. ती म्हणाली, खरोखर, ही फारच विलक्षण हकीगत, ऐकून द्रव येण्यासारखी; मी ही ऐकली नसती तरी बरं झालं असतं. परन्तु तिनं असाही उद्गार काढला, की ब्रह्मदेवानं माझ्याकरितां असा नवरा निर्माण केला असता तर फार चांगलं झालं असतं. सारांश, माझ्यावर गुजरलेल्या संकटांची हकीगत ऐकून तिचं माझ्यावर मन बसलं, आणि माझी कळकळ करणारा प्राणी हाच, हें पाहून माझंही मन तिच्यावर बसलं. हे काय ते सरकार माझे चीरमंत्र. ही आलीच ती. तिलाच आतां विचारावं म्हणजे झालं.

( कमळजा, जाधवराव वगैरे येतात. )

**राजा** - अशी संकटाची व पराक्रमाची हकीगत ऐकून कुणाच्याही मुलीचं मन यांच्यावर बसलं असतं. हें पहा मानाजीराव, आतां 'तुटल्या हातापेक्षां मोडकी तरवार बरी' या न्यायानं झाली हीच गोष्ट चांगली असं माना म्हणजे झालं.

मानाजी० तिचं ह्मणणं एकदां ऐकून घ्यावं अशी विनंती आहे. तिच्या खुषीनंच हा प्रकार झाला असेल, तर मी शृंगाररावाला काडीइतका सुद्धां दोष देणार नाहीं. देईन तर अधोगतीस जाईन. ये मुली, अशी इकडे. या मंडळींत तुला विशेष कोणाच्या आज्ञेप्रमाणं वागावंसं वाटतं? साग पाहूं.

कमळजा –( चोहोंकडे पाहून ) दोघांच्या आज्ञेप्रमाणं वागावंसं वाटतं. आपण माझे वडील, आपण मला लहानाची मोठी केलीत, ज्ञान दिलंत, तेव्हां आपली आज्ञा मला प्रमाणच आहे. परंतु माझी आई जशी माहेरचीं माणसं सोडून आपल्या अंकित होऊन राहिली, तसं मलाही या शृंगाररावांचं अंकित होऊन राहिलं पाहिजे; आणि हा माझा धर्मच आहे; याच्या आड कोण येणार?

मानाजी०—झालं, आटपलं माझं काम, सरकार; आतां दरबारी कामाला सुरुवात व्हावी. ही कारटी झाली नसती तरी बरं होतं. अहो शृंगारराव, घ्या आतां ही तुमची स्त्री; मी मोठ्या संतोषानें तुमच्या स्वाधीन करतों. पोरी, मी मोठा सुखी, दैववान्, म्हणून मला दुसरी कारटी नाहीं. नाहींतर तुझ्या या गुणानीं मीं तिला मात्र कोंडून ठेविली असती.

राजा –मानाजीराव, आतां उगीच खेद करूं नका. कारण उपाय खुंटले, म्हणजे दुःखच संपलं. झाल्यागेल्या गोष्टीचं दुःख करणं, म्हणजे नवीन दुःख उकरून काढणं होय. अहो, दैवच उलटल्यावर समाधानाशिवाय दुसरा मार्गच नाहीं. चोरी झाल्यावर हंसणं ह्मणजे

धीराभाव टाकविणं, आणि रडणं म्हणजे स्वताहालाच नागवून घेणं, ही गोष्ट ध्यानांत आणा.

**मानाजी०**—सरकार, असेच आहे, तर हबशी आपलं सोनवट घेईनात ! आपण त्यांच्याकडे पाहून हंसलं म्हणजे झालं. मग कांहीं आपलं बट गेलं नाहीं. तें कांहीं नाहीं सरकार, केवळ समाधानाच्या गोष्टी सांगून दुःखाचे घाव कसे बुजतील ? शब्द म्हणजे शब्दच.—असो, आतां कामाला आरंभ करावा.

**राजा**—झुंजारराव, हबशानं अरमार कडेकोट तयारीनं सोनवटावर निघालं आहे. तिथल्या ठाणेदार त्यांना दाद द्यायचा नाहीं; पण तुम्ही तिथले पुरे माहितगार, म्हणून तुम्हालाच रवाना करायचं ठरलं. शिवाय हबशाला तुमचा दराराही विशेष आहे.

**झुंजार०**—बंदा तयार आहे सरकार. या गोष्टीचाच लहानपणापासून सराव असल्यानं, लढाईच्या मैदानांत तुमच्या फत्तेवर जरी निजलों, तरी पराच्या उंच उंच मऊ बिछान्यावर निजल्याप्रमाणं वाटतं. माझा स्वभावच असा बनून गेला आहे, कीं बिकट प्रसंग म्हटले, कीं मला स्फुरण चढतं. सबब हुकुमाप्रमाणं जायला तयार आहें.

**राजा**—ठीक आहे; आज पहाटेस निघा तर. आणि तुमच्या कुटुंबाला, तुम्ही परत येईपर्यंत मोहरीच ठेवा म्हणजे झालं.

**मानाजी०**—नको नको सरकार, ती पीडा माझ्या घरीं नको आतां.

**झुंजार०**—मलाही तसं करणं रास्त दिसत नाहीं.

**कमळजा** --आणि मीही आतां त्यांच्याजवळ राहा-यची नाहीं; कारण त्यांच्या डोळ्यांसमोर असल्यानं त्यांच्या जिवाला काहीं सुख लागायचं नाहीं; उगीच नेहमीं श्रम मात्र करून घेतील. त्यांतून मीं धनदौलतीवर लाथ मारून, बाबासाहेबांच्या मताविरुद्ध, हा देह मनो-भावानं यांना अर्पण केला, तो यांचा माझा निरंतर सहवास घडावा म्हणून केला. लढाईचीं संकटं यांच्याबरोबर सोसा-यला मी तयार झालें. याचं रूप पाहायचं तें मीं यांच्या अंतर्यामीं पाहिलं. आणि आतां जर मला एकटीला सोडून हे लढाईवर गेले, तर मग काय! म्हणून मलाही बरोबर जायचा हुकूम असावा.

**झुंजार०** खुदावंत! हिचा अर्ज मंजूर करावा अशी पायांजवळ विनंती आहे. स्वताहाच्या सुखाकरितां मी ही विनंती करीत नाहीं; फक्त हिची हौस पुरवावी हीच माझी इच्छा. आतां ही बरोबर असल्यानं, मी विषय-विलासांत गुंग होऊन, माझ्या हातून नोकरींत कसूर आली, तर शिपायाचा बच्चाच नव्हे.

**राजा** ठीक आहे. झुंजारराव, हिला बरोबर न्या किंवा मागें ठेवा, पण आजच्याआज तुम्हाला निघालंच पाहिजे.

**झुंजार०** जी, हुकूम. ( पडदा पडतो. )

( **झुंजारराव, गिल्लाजीराव, जाधवराव** वगैरे बाहेर येतात. )

**झुंजार०** जाधवराव, तुम्ही तुमचा कबिला व आ-मचा कबिला घेऊन मागाहून या. नीट संभाळून. तुमच्या-शिवाय दुसरा कोणी विश्वासू नाहीं, म्हणून तुम्हाला सांगितलं, समजलांत?

जाधव०—ठीक आहे धनीसाहेब.

(जाधवराव व रंभाजीराव मंगीज सर्व जातात.)

रंभाजी० जाधवराव—

जाधव० काय ह्मणतां रंभाजीराव?

रंभाजी० मी आतां काय करणार आहें समजलांत का?

जाधव० काय तुम्ही? घरीं जाऊन स्वस्थ निजणार, हेंच की नाहीं?

रंभाजी०—छे! छे! छे! बल्भीमनल्यांत जाऊन एकदम जीव देणार.

जाधव०—असं कराल, तर आपली आमची कांहीं दोस्ती रहाणार नाहीं, सांगून ठेवतों. असे कसे हो तुम्ही अगदीं वेडे पीर?

रंभाजी०—अहो! प्राण जड झाल्यावर जिवंत रहाणं हाच वेडेपणा.

जाधव०—काय अघोर कल्पना ही! आज मला जन्मून सात चोक अठ्ठावीस वर्षं झालीं. आणि मला नफानुकसान कळायला लागल्यापासून मी पाहतों आहें, पण आपल्या प्राणाची खरी किंमत जाणणारा एकसुद्धां मर्द मला दिसला नाहीं. अरे! अरे! अरे! रंभाजीराव, मी तर सांगतों, कीं जनावर व्हायचें पत्करीन, पण एखाद्या बटकुलीकरितां "जीव देतों" हीं अक्षरं कधीं कधीं उच्चारणार नाहीं.

रंभाजी० मग करूं काय? इतकं वेडाऊन जाणं शरमेची गोष्ट आहे, मी कबूल करतों; पण प्राक्तनापुढें इलाज नाहीं.

जाधव०—प्राक्तन! बोडक्याचं प्राक्तन! अहो कांहीं करणं, वेडावून जाणं, न जाणं, हें आपल्या स्वताहाच्या मनावर अवलंबून आहे. आपलं शरीर हा मळा आणि मन हा त्यांतला माळी; हा त्यांत जसं खत पाणी घालील, जसं बीं पेरील, तसतशी फळ येतील त्याच्यावरची सर्व मालकी मनाची आहे. या जीवितरूपी तराजूला एक विचाराचं व दुसरं विषयवासनांचं अशीं दोन पारडीं आहेत. विचाराचं पारडं नसतं तर आपल्या विषयवासना प्रबळ होऊन कांहीं भलंच झालं असतं. परंतु आपल्याला विचारशक्ति आहे, तिच्यायोगानें आपलं क्षुब्ध अंतःकरण स्थिर करतां येतं, अनिवार विषयवासना कमी करतां येते, आणि तुम्ही ज्याला प्रेम प्रेम ह्मणून ह्मणतां तें तरी यांतच येतं.

रंभाजी० छे! असं नाहीं व्हायचं.

जाधव० नाहीं काय? प्रेम ह्मणजे फक्त इंद्रियांची वासना आणि निव्वळ मनाची संमति. या असे, अगात कांहीं मर्दाई भरा. तें सोडून जीव देतों ह्मणतां ' छे! कुच्यामांजरांच्या पोरांनीं हवा तर जीव द्यावा. रंभाजीराव, मी तुमचा खरा स्नेही ह्मणवितों; आणि कसंही करून तुमचा इष्ट हेतु पार पाडायचा हा माझा निर्धार आहे. त्याची हल्लीं जशी संधि आली आहे, तशी कांहीं पुन्हा यायची नाहीं; फक्त पैशाचं बळ पाहिजे. चला. आमच्याबरोबर लढाईवर चला; कलेविले राखून चेहरा असा तुळत्या कीं यों. पण थैली भरा. (इकडे तिकडे पाहून) कमळजा शृंगाररावावर फार दिवस फिदा होऊन राहील, असं व्हायचंच नाहीं पण थैली तमाम नाहीं राहायचा नाहीं.

अहो झटकन् जुळलं, तें तटकन् तुटायचंच. पैसा मात्र तयार करा. श्रृंगाररावाचं मन बदलायचंच, हें मी तुम्हाला खात्रीनं सांगतों. कारण आज त्याला जें अगदीं मेल्यासारखं मिटास लागतं, तेंच कांहीं दिवसांनीं कुटकीसारखं कडू लागेल! तिलाही हा नवरा कुठून पत्करला असं होऊन, तरुण जवान पाहिलाच पाहिजे; अगदीं पाहिलाच पाहिजे. म्हणून रावसाहेब, थेर्डी भकंप भरा. तुमचे प्राण तुम्हाला जड होऊन टाकायचेच असले, तर तळ्यांत विहिरींत जीव देण्यापेक्षां, दुसरी एखादी नाजुकशी तरी शकल काढा. हें पहा, त्या भटकाभिंग भामट्याचं, आणि त्या चटकचांदणीचं पोकळ प्रेम आमच्या हिकमतीनं भुईस मिळालं, तर ती तुमची झालीच, असं समजा. पण पैसा! भागूबाईसारखा जीव देतों म्हणतां! छे! अगदीं गैर! तिच्यासारखी कांशी गळ्यांत नसो बेहत्तर, पण ती मिळत नाहीं म्हणून मी हाणें जीव देतों, वा:! काय बहाद्दरी!

**रंभाजी०** बरं, तुमच्या आशेवर प्राण धरून राहिलों, तर तुमची नकी खात्री आहे का?

**माधव०** माझ्याविषयीं तुम्ही अगदीं बेफिकीर रहा. चला, पैसा जमवा. मी तुम्हाला पुष्कळदां सांगितलं आहे; पुन्हा आणखी सांगतों, कीं त्या श्रृंगाऱ्यावर माझा पक्का दांत आहे; तुमचाही असायला कारण कमी नाहीं; म्हणून तुम्ही आम्ही मिळून दावा उगवूं. त्याच्यापासून तिला उपटलीन, म्हणजे तुमचीही चैन उडाली, आणि आम्हालाही गम्मत झाली. अजून काळाच्या पोटांत पुष्कळ गोष्टी आहेत, त्या सर्व बाहेर पडतीलच. चला आतां, आणि आधीं पैशाची तजवीज; जास्तकमी उद्यां बोलूं. रामराम.

रंभाजी० पण उद्यां गांठ ?

जाधव० आमच्या बिऱ्हाडीं. रामराम. पण, अहो, अहो रंभाजीराव, जीव द्यायची गोष्ट पुन्हा नाहीं काढायची. ऐकलेंत का ?

रंभाजी० छे हो ! आतां कोण जीव देतो. तो बेत फिरला. आतां जाऊन जमीनजुमला, डागडागिने सर्व विकून रक्कम गोळा करतों.

जाधव०—शाबास ! हरकत नाहीं. रामराम. ( रंभाजी जातो. )

( तो गेला असें पाहून मोठ्यानें हंसून. )

—या वेड्यांना फसवून नेहमीं अशी मी आपली तुंबडी भरतों ! रास्तच आहे; धड नफाही नाहीं आणि गम्मतही नाहीं, आणि अशा बैलांच्या नादीं लागून जर वेळ गमावली, तर आजपर्यंत आम्हीं कमावलेल्या अकलेचा उपयोग काय ? मुंजाऱ्यावाशी तर आमचा उभा दावा. ही स्वारी आमच्या बिऱ्हाडयांत घुसल्यापासून, बाहेर भुमका आहे. हें खरेंच आहे असें म्हणवत नाहीं, परंतु मी तसें धरून चालणार. त्याचा आपल्यावर विश्वास चांगला आहे, हें एक त्याच्यावर डावपेंच चालवायला नामी साधन आहे. पिलाजीरावही सुरेख देखणा आहे. कसें ! कसें ! पाहूं– ( विचार करून ) एक त्याचा हुद्दा मिळवायचा, आणि दुसरें आपला मतलब साधायचा, अशी दुहेरी लुच्चेगिरी लढवायची; कसें बरें ? हां ! काहीं दिवसांनीं मुंजाऱ्याचे कान असे भरायचे, कीं तुझ्या बायकोची आणि पिलाजीरावाची फार सलगी आहे, त्याचाही रंगेल चेहरामोहरा, अशा संशयाला ठीक आहे. त्याला पाहून बायका

बिघडायच्यान. शुंनागराव तर मनाचा इतका भोळा आहे, कीं ढोंग्याला मुद्दां तो इमानी समजतो. तेव्हां त्याचे कान धरून मी त्याला गध्यामागल्या आसे आसे हवा तसा वळवीन. जुळलं मनांत तर उतरलेंच. आतां अजब करणी करून नगापुढें आणायचें, एवढं आपलं काम! (जातो.)

(पहिला अंक समाप्त.)

---

# अंक २ रा.

## प्रवेश पहिला. सोनवेटांतील एक बंदर.

(हिम्मतराव आणि कानाजी येतात.)

हिम्मत० —या टोंकावरून समुद्र काही दिसतं का?

कानाजी —हो, भारी तुफान दर्या. आणि वर अस्मान, शिवाय काही नाही.

हिम्मत० —या वादळांत जमिनीवर काय कल्होळ उडवून दिला असेल. हा किल्ला असा तुफान वादळांत पूर्वी कधीच सांपडला नव्हता.

कानाजी —असे दिसून येतं. [illegible] चवताळून दर्यांना ओढितात. इतका [illegible] दर्या आपण नव्हता पाहिला.

हिम्मत० —हबशाचें आरमार आपल्या [illegible] जागीं नसेल, तर बुडालेंच हाय. असा अस्मान वाऱ्याच्या तडाख्यांत काय टिकेल.

(हिरोजी येतो.)

हिरोजी —[illegible] दोस्त. एका,

**सिदोजी**—सरलष्करांचे निशाणवाले, जाधवराव.

**पिलाजी०**—वाः, त्यांनीं तर खूप दौड केली बुवा; असं भयंकर तुफान, खवळलेला समुद्र, सोसाट्याचा वारा आणि मोठमोठे खडक, यांना सुद्धां सौंदर्याची चांगली परीक्षा आहे असं वाटलं; ह्मणून त्यांनीं जातिस्वभाव विसरून कमळजाबाईंना मार्ग दिला.

**हिम्मत०**—कमळजाबाई कोण ?

**पिलाजी०**—मीं आतां सांगितलं त्या सरलष्करांचं कुटुंब. परमेश्वरा ! वाऱ्याला अनुकूळ करून त्यांचं गलबत सुखरूप आण, माईसाहेब त्यांना कडकडून भेटूं देत, आमचा धीर खचला आहे तो पुन्हा येऊं दे आणि इथल्या रहिवाशांना सुखी कर. एवढं मागणं आहे. ही पहा, समुद्रलक्ष्मी किनाऱ्यावर आली. (सर्व लवून मुजरा करतात.) माईसाहेब, ईश्वरी कृपेचं चक्र आपल्याभोंवतीं सार्वकाळ फिरतं राहो !

**कमळ०**—पिलाजीराव, अगोदर स्वारीची काय खबर ती सांगा !

**पिलाजी०**—अद्याप आले नाहींत, पण खुशाल आहेत; आणि लवकरच येतील.

**कमळ०**—(हसून) पण तुमची चुकामूक कशी पडली ?

**पिलाजी०**—अस्मानाच्या आणि दर्याच्या झटापटींत चुकामूक पडली. पण ऐका, गलबत आलं वाटतं, सिदोजी, जा पाहून या वरं कुणाचं तें. (सिदोजी जातो.) जाधवराव, खुशाल ? सारजाबाई ठीक आहेना ? जाधवराव, कुटुंबाशीं बोललों ह्मणून रुसला नाहींना ?

**जाधव०** छे! पण कधीं कधीं ती आमच्यावर जितकं तोंड सोडते, तितकं जर तुमच्यावर सोडील, तर पुरे पुरे होईल तुम्हाला.

**कमळ०**—भलतंच. तिला तर मुळींच बोलायला नको.

**जाधव०**— काय सांगूं माईसाहेब, रात्रीं मला झोंप सुद्धां घेऊं देत नाहीं: एवढं खरं, कीं आपल्यापुढं मात्र तिची टकळी चालत नाहीं.

**सारजा**—उगीच कांहींतरी बोलावं झालं.

**जाधव०** –या, मागं का? अशा पुढें या. तुम्ही बायका ह्मणजे—

**कवित.**

बाहिर असतां चित्रें जैशा ।। घरांत घटा बोलति तैशा ।। १ ।।
चुलीजवळि जणुं जंगली म्हैस्या ।। दुःख द्यावया उदार वेश्या ।। २ ।।
कुणी दुसाविना डाकिणी केवळ ।। घरकामीं वड् ढंगळमगळ ।। ३ ।।
मगर मात्र तुह्मि एकया कामीं ।।

**कमळ०** -चला! निंदखोर कुठले!

**जाधव०** खोटं नव्हे माईसाहेब.

**सारजा** -पण माझ्यावर नको एवढं कवित करायला.

**कमळ०**—जाधवराव, माझ्यावर कवित करा ह्मणून सांगितलं, तर कसं कराल बरं?

**जाधव०** –मेहरबानी करून तेवढं नका सांगूं माईसाहेब; कारण माझ्या कवितांत निंदेशिवाय कांहीं मिळायचं नाहीं.

**कमळ०**—पहा तर खरं करून. (पिलाजीराव जात) पण स्वारीचा तपास काढायला गेलं का कुणी? (एकीकडे)

मला आज कांहीं चैन पडत नाहीं. आपली वरवर हंसून-खेळून वेळ चालविते. माधवराव, करतांना कवित?

माधव०—होय, त्याच विचारांत आहें, क—वी—त. हं, ऐका माईसाहेब, कवि काय म्हणतात तें,—

ओवी.

चतुर आणि वर्ण गोरी । ऐसी उपवर जी सुंदरी ॥
तीस साजे ऐसा भला वर । चातुर्याची गोष्ट हे ॥ १ ॥

कमळ०—खासं वर्णन! बरं, काळी कुरूप असून चतुर असली तर?

काळी कुरूप आणि चतुर ॥ ऐसी होय जी का नार ॥
शोधोनि काढी ती गोरा वर ॥ निजरूपा जोगता ॥ २ ॥

कमळ०—तुम्ही तर अधिकच थमरायला लागलां.

सारजा—बरं, सुंदर गोरीपान असून साधीभोळी असली तर?

माधव०—

अभंग.

सुंदर गोरी असता भोळी ॥ नाहीं होणें ऐसी भली ॥ १ ॥
कारण ऐशा भोळ्यापणें ॥ मिळे नवरा धनवान् जाणें ॥ २ ॥

कमळ०—हें असलं कवित, चंगीभंगी ऐकट्या लोकांना हंसवायला फार चांगलं. बरं, कुरूप असून जी साधीभोळी असेल, तिच्याविषयीं आपलं काय म्हणणं आहे, सांगा पाहूं?

माधव—ऐका,—

कुरूप साधीभोळी जरी । मुद्दाम चतुरांचीच कांत करी ॥ ३ ॥

कमळ०—काय अंधार हा! तुम्ही आपले खापरीला

हिरकणीचं मोल लावतां ! बरें, जी स्त्री आपल्या सद्गुणांच्या जोरावर प्रत्यक्ष निर्देशानें असें म्हणते, कीं माझ्यांत कांहीं व्यंग असेल तर काढ, अशा साध्वी माउलीविषयीं आपला काय प्रकाश पडतो पाहूं बरं !

जाधव०—

सुंदर असतां न धरी ताठा ॥ न करी गर्वाचा बोभाटा ॥ ४॥
असतां अगणित लक्ष्मी घरीं ॥ नटणं ठावें नाहीं तरी ॥ ५॥
जरी इच्छा झाली कांहीं ॥ तरी समयासमया पाही ॥ ६ ॥
कोप कोणाविषयीं आला ॥ विवेकानें वारी त्याला ॥ ७ ॥
हिरा टाकुनी गारा पण ॥ ऐसें नाहीं जीचें करणें ॥ ८ ॥
गुण देखी, जे असती । जरी जन्मे ऐसी नारी ॥ ९ ॥

कमळ०—तर काय !

जाधव०—तर काय !

तिणपासुन जावी थोर ॥ किती पाळावें पोरें ॥ १० ॥

कमळ०—अहा ! काय पण खासं तात्पर्य काढलं ! सारजाबाई, तुम्हीं नका हो यजमानाचं ऐकत जाऊं. का पिलाजीराव, ऐकलंतना पांडित्य !

पिलाजी०—बाईसाहेब, तिथं कांहीं आंतबाहेर नाहीं; ओठाला येईल तें स्पष्ट बोलायचं, शिपाई आहेत, इतकंच लक्षांत घेतलं म्हणजे झालं. ( कांहीं हळू हळू कुजबुजतात. )

जाधव०—( आपल्याशीं वाः ! इतकी सलगी ! चांगल्या कानगोष्टी चालल्या आहेत; तसेंच हंसा. बरं आहे ! पिलाजीराव, या तुझ्या सलगीच्या नाजुक जाळ्यांतच तुझ्या नंगड्या गुंतवून टाकतों तर होय म्हण ! ( शिंग ऐकून उघड ) धनीसाहेब आले वाटतं.

कमळ०—खरेंच का ? चला तर. सामोरी जाऊं.

पिलाजी० हे पहा आलेच !

(झुंजारराव येतो, परस्पर आलिंगन देतात.)

झुंजार० – वाहवारे मेरे बहादर ! लाडके, तूं अघाडी मारलीस हें पाहून मला जितका आनंद तितकाच अचंबा वाटतो. शाबास ! प्रत्येक तुफानाचा असाच जर गोड परिणाम होईल, तर आकाशपाताळ एक करून सोडणारीं अशीं कितीं का तुफानें सुटेनात; दर्यातलीं जहाजें प्रचंड लाटांच्या शिखरांवरून उंच अस्मानांत जाऊन तिथून खालीं पाताळांत पडलीं तरी चिंता नाहीं. अहाहा ! मृत्यु यायचा तर अशांत यावा; कारण असा सौख्याचा दिवस पुन्हा कधीं उगवायचा नाहीं.

कमळ० – हें काय भलतेंच बोलणें पण ! आई जगदंबे ! आमच्या प्रेमाला भरतें येऊन आम्ही वाहत्या सुखांत नादावें, एवढें देणें दे.

झुंजार० – जगदंबे असेंच कर ! छे ! आज आनंदाचा कळस आला. गळा दाटून शब्दसुद्धां निघत नाहीं. लाडके, (चुंबन घेण्यासाठीं तिची हनुवटी धरून) तुझ्या माझ्यांत पुढें कलह व्हायचा असेल तर हाच. हाच कलह !

जाधव०—(बाजूस) शाबास ! खूपच रंग जमला आहे ! पण या रंगाचा बेरंग करीन तरच मी नांवाचा जाधवराव ! शिवाय–इमानी तो इमानी !

झुंजार०—चला आतां किल्ल्यांत जाऊं. दोस्त, हबशाचें आरमार बुडून फस्त झाल्यानें लढाई आटपली. इथली आमची सर्व दोस्तमंडळी खुशाल आहे ना ? लाडके, इथल्या लोकांची माझ्यावर किती भक्ति आहे हें

पहा आतां. अशा मेजवान्यावर मेजवान्या झडतील, की तुला फुरसत नाहीं मांपडायची; बरं जाधवराव, बंदरावर चला आणि माझें सामानसुमान उतरण्याची व्यवस्था लावा. (गमगम करून जाधवराव जातो, त्याच्या मागून रंभाजीराव जातो.) लाडके चल आतां. (सर्व जातात.)

## प्रवेश दुसरा.

(जाधवराव व रंभाजीराव.)

**जाधव०**—ऐका, हलकट लोक प्रेमपाशांत सांपडले, म्हणजे त्यांच्या आंगात जास्त थोरपणा येतो असं म्हणतात; तशी तुमच्या आंगांत जर हिम्मत असली, तर मी सांगतों तेवढं ऐका. आज रात्रीं पिलाजीराव स्वतः चौकी पहाऱ्याचा बंदोबस्त पहाणार आहेत; तेव्हां हो पण ही गोष्ट तुम्हाला अगोदर सांगितली पाहिजे, कीं कमळजा पिलाजीरावाशीं लागू आहे.

**रंभाजी०** पिलाजीरावाशीं! कमळजा! अगदीं झूट आहे.

**जाधव०**—(अपल्या तोंडावर बोट ठेवून) गोष्ट फोडायची नाहीं कुठें, सांगतोंतें नीट ऐकून घ्या. अहो, फक्त शृंगाररावाच्या लंब्याचव्या अजब थापा ऐकून, ती त्याला एकदम भाळली, ह्मणून अजून सुद्धां तसल्या थापांवरच खुष होऊन राहील? तिच्या डोळ्यांचं तर समाधान झालं पाहिजे ना? पण या धुंगडाकडे पाहून समाधान व्हावं कसं? एकदां विषयवासना थंड पडल्यावर, तिला पुन्हा चेतवायला दोघांच्याही वयांत काय, रूपांत काय, आचारांत काय, विचारांत काय, चांगलाच मेळ पाहिजे. पण

इथें सगळा उलटा प्रकार ती रंभा आणि हा राक्षस! तेव्हां त्याच्याशीं लग्न केल्यानं आपल्या सुंदर नाजुक तरुणीची माती झाली, असं वाटून तिला त्याचा किळस येणं साहजिक आहे. आणि एकदां त्याच्यावरचं मन उडालं, म्हणजे अर्थात तें दुसऱ्यावर बसलंच पाहिजे. ही गोष्ट जर बिनतक्रार कबूल आहे, तर महाराज, आपणच सांगा, कीं तिच्या मनांत भरण्यासारखा भाग्यवान् गडी, पिलाजीरावाशिवाय दुसरा कोण? कारण, तो मनुष्यच तसा आहे. अट्टल सोदा, उत्तम बोलका, बडा ढोंगी, पक्का धापेबाज, पुरा इष्की, मोठा धोरणी. बायकांची नजर तरी काय! नसतीच गोष्ट मनांत भरवून देणारा. बिलंदर असामी! इतकं असून पऱ्हा रूपसुंदर, भरज्वान! तात्पर्य— साळ्याभोळ्या अल्लड पोरींना भुलवायला जे गुण पाहि-जेत, ते त्याच्यांत पूर्ण भरलेले आहेत. अशा राजश्रीवरो-बर ती कधीच संसार जुळवून पार झाली! आहांत कुठें?

रंभाजी० छे, असं करीलसं वाटत नाहीं. तिचं मन म्हणजे शुद्ध गंगाजळ आहे.

जाधव० चोडक्याचं गंगाजळ! ती कांहीं स्वर्गा-तून उतरली नाहीं. तसं असतं, तर त्या माकडावर का फिदा झाली असती? पिलाजीरावाचा आणि तिचा लग-ळपणा चालला होता, तो नाहीं वाटतं पाहिलात?

रंभाजी० हो पाहिला. पण त्यांत काय?

जाधव० त्यांत काय? मदनमहाराजांचं बिनीचं निशाण हें कुकर्माचा पहिला पाया हा, समजलांत! रंभा-जीराव, आतां तुम्ही माझ्या धोरणानं चला; कारण मी तुम्हाला इथें आणलं आहे. आज रात्रीं मी तुम्हाला

माझ्या हुकमतीनं पहाऱ्यावर नेमतों. तुम्ही कोण हें कांहीं पिलाजीरावाला माहीत नाहीं. मीही आसपास कुठें तरी असेन. पिलाजीराव पहाऱ्याच्या देखरेखीला आला, म्हणजे मोठ्यानं ओरडून म्हणा, अगर त्याच्या बंदोबस्तांत कांहीं खोड काढून म्हणा, किंवा दुसरी वाटेल ती कुरापत काढून तो खूप संतापेल असं करा.

रंभाजी०—ठीक आहे; हें माझं काम.

जाधव०—पण स्वारी फार तापट आहे बरं. हा हां म्हणतां चवताळेल; आणि एकदां चवताळला म्हणजे हातघाईवर सुद्धां येईल. आला तरी येऊं द्या, पण इतकं करा. कारण एवढ्यावरून देखील मी या बटांत बंडावा उत्पन्न करून त्याला बरतर्फ करवीन. तो बरतर्फ झाला, म्हणजे तुमचं काम फत्ते. कारण आज तुमच्या कामाला काय तो त्याचाच आडकाठी की नाहीं ? सवडी मिळाली की चालला आमचा हात. म्हणून एवढं करा.

रंभाजी०—करीन, पण मीठ आली पाहिजे.

जाधव०—अहो मीठ येणारच. बरं चला आतां. मी बंदरावर जातों. मग किल्ल्यांत भेटा रामराम.

रंभाजी०—रामराम. जातो.

जाधव०—पिलाजीराव तिच्यावर फिदा आहे यांत शंकाच नाहीं; बरं ती त्याच्यावर फिदा आहे हीही गोष्ट कळण्यासारखी आहे. आतां तो झुंजारराव-माझा दुष्मान् तरी गंभीर, प्रेमळ आणि उदार मनाचा आहे; त्याचं तिच्यावर निश्चळ प्रेम राहणार, यांत शंका नाहीं. माझाही तिच्यावर डोळा आहे. पण तो नुसता हव्यासाकरितां नव्हे त्यांत थोडा सूडही साधावयाचा आहे. कारण

त्या मस्त झुंजाऱ्यानं आमच्या घरांत कांहीं खटपट के-ल्याचा मला वहीम येतो. या गोष्टीचं स्मरण झालं ह्मणजे जहर खाल्ल्याप्रमाणं सर्वांगाची आग आग होते. म्हणून त्याची बायको घेऊन, त्याला माझ्या पंक्तीला आणवून बसवीन, तेव्हांच ही आग विझेल. कदाचित् हें साधलं नाहीं, तर निदान त्याच्या मनांत बायकोविषयी असा संशय नगी भरून देईन, कीं त्याची अक्कल गुंग होऊन जावी. हा कावा पार पडायला, हें रंभ्या कुत्रं मात्र माझ्या हातांत टिकलं पाहिजे, ह्मणजे पिल्याची भंवेरी उतिरलीच! एकदां कचाट्यांत सांपडल्यावर मग काय! झुंजारराबाशीं त्याची हवी ती नालस्ती करीन, झुंजा-ऱ्याला पाहिजे तसा गाढवासारखा वळवीन, त्याचं मन चिथावून त्याला वेडा बनवीन, आणि इतकंही करून, उलट त्याच्याकडून वाहवा मिळवीन. हे सर्व मनांत उतरलं; पण अजून गोंधळ आहे जरा. टकबाजीनं खरं रूप तीं लढवून पाहिल्यावांचून हिंमत नाहीं. (जातो.)

## प्रवेश तिसरा.

दौंडीवाला (बाहेर येऊन) यहांके तमाम लोगोंको जाहिर किया जाता है, के दुष्मन् हबसीका आरमार बडे तुफानके मारे दर्यामें डूब गया, यह खबर अभी पहुंची; इसवास्ते सब लोगोंमें बहोत खुशीमें गानेखानेमें अगर दिलचाह उस मजेमें आजकी रात गुजारना वसा सरकार साहबका हुकम है. (जातो.)

## प्रवेश चवथा.

(झुंजारराव व पिलाजीराव.)

झुंजार० आज रात्रीं पहाऱ्याच्या बंदोबस्तावर

तुम्ही स्वतः मांगली हुषारीनं नजर ठेवा. पर्नीत गुंग होऊन बेताल न होण्याची आपणच आधीं खबरदारी राखली पाहिजे.

**पिलाजी०** जाधवरावाला ताकीद दिलीच आहे; शिवाय मीही नजर ठेवतों.

**झुंजार०**—हरकत नाहीं; जाधवरावही आमच्या खाशांचा आहे. उद्यां लवकर या; कांहीं बोलायचं आहे.

( झुंजारराव जातो, नंतर जाधवराव येतो. )

**पिलाजी०** बरे आलांत; चला पहाऱ्यावर जाऊं.

**जाधव०**—इतक्यांत! अजून दहा घटका सुद्धां रात्र झाली नाहीं. सरलष्करसाहेबांनीं आम्हाला रजा दिली हें रास्तच. कारण-प्रेमांतलं कुटुंब आहे; पण याबद्दल त्यांना कांहीं नाहीं दोष द्यायचे आपण.

**पिलाजी०** त्या आहेतच तशा स्वरूपसुंदर; सौंदर्याचा अगदीं कोंवळा लुसलुशीत कोंभ आहे!

**जाधव०** आणि डोळ्यांत तरी काय चमक जहर भरलं आहे तुमचं!

**पिलाजी०** नजर मनोहर खरीच; पण मला वाटतं, फार मर्यादेची.

**जाधव०** नमंच भाषणसुद्धां अगदीं मदनाची तुतारी, नाहीं!

**पिलाजी०** त्यांच्यांत व्यंग असं कोणतंच नाहीं.

**जाधव०** नशीबवान् आहेत, मारूं देत मजा. बरं चला; मी उत्कृष्ट शराब आणिवली आहे, ती घेऊं आपण; आणि इथले दोघे शूर मर्द बाहेर आहेत, त्यानाही सरलष्करसाहेबांच्या नांवानं झोकूं द्या थोडी.

पिलाजी० हे माधवराव ! आज तर नकोच. आणि या कामांत मी फार दिला आहें. शराब पाजवि-ण्यापेक्षां चैनबाजीची दुसरी काहीं तऱ्हा निघाली असती, तर फार चांगलं झालं असतं.

माधव०—अहो ते आपले दोस्त आहेत; फक्त एक पेला ? तुमच्याबद्दल मी घेतों, झालं ?

पिलाजी० हें काय बरं; मला नका आग्रह करूं. मी संध्याकाळीं बरंच पाणी मिसळून एकदांशी घेतली होती, पण तितक्यानंच इथें काय तरंगावर तरंग चालले आहेत. या दिलेपणापुढें इलाज नाहीं. काय करूं ?

माधव० काय बोलता राव ! आजची रात्र तर मौजेची. जिकडे तिकडे काय चैन चालून राहिली आहे. त्यांनाही पाहिजे, बघा

पिलाजी०—कुठें आहेत ते ?

माधव० ते. दरवाज्याबाहेर–बोलवा त्यांना आंत.

पिलाजी०—बोलावतों. पण आपल्याला नाहीं हें पसंत. (जातो)

माधव०—( त्याच्याकडे पहात ) स्वारींनीं थोडी घेतलीच आहे; आणखी थोडी पाजिली, की त्या आमच्या कुत्र्या-सारखे, जरा चिडिवल्याबरोबर, भों भों करायला लागतील. दुसरे भुरणीस लागलेले आमचे वेडे पीर रंभाजीराव, कमळजेच्या नांवानं दारू झोकून तयार झाले आहेत; ते आज पहाऱ्यावर. तिसरे हे तडख जवान, त्यांना मान म्हणजे प्राण आहे आपला; शिवाय या बेटांतल्या पुंडांचे नाईक, त्यांनाही मी आज खूप दारू पाजिली आहे. तेही पहाराच करणार—

( पडद्यांत मोठा हशा होतो. निरनिराळे बोल ऐकूं येतात. )

आतां या छाकट्यांत पिलाजीरावाकडून असा कांहीं तरी घोटाळा करवायचा, की सगळं बेटंबेट खलकून जाईल—आलेच हे. म्हणण्याप्रमाणेंच सर्व जुळल्यावर मग काय ? आमचं नाटक चाललं म्हणून समजा.

( पिलाजी, परसोजी वगैरे येतात. )

**जाधव०**—कौन् है ? छोकरा, शराबकी शिशी लाव.

(दारू आणल्यावर जाधवराव पिलाजीरावास पेला भरून देतो.)

**पिलाजी०** सुरवातीला इतकी ?

**परसोजी०**—एक पेला कांहीं फार नाहीं.

**जाधव०**—छोकरा, आणखी आण. ( गातो. )

पद. ( "काली बिल्लीने" या चालीवर. )

पिवो पिवो शिराब औ गुलाब पिवोजी ॥ ध्रु० ॥
कल क्या होवे कइ ना जाने, आज घडी अपनी ॥
खाना पीना इस दुनियाकी मजा लेवोजी ॥ १ ॥

**पिलाजी०**—खाशी जाधवराव ! वाः कुठें शिकलां हें ?

**जाधव०** फिरंगी मुलुख आहे हा; तिथले लोक शराबबाजीत बडे पटाईत. त्यांना हात धरणार कोणी नाहीं.

**पिलाजी०**—( किंचित् हसून ) इतके वस्ताद आहेत का ते ?

**जाधव०**—तें काय विचारतां ! त्यांना पितांना बघून तुम्हाला ओकारी येईल; घ्या.

**पिलाजी०**—हा मल्लिकार्जुनाच्या नांवानं.

जाधव० फार साफ, मलाहि कळलें आहे.

पिलाजी०—मग जा-जा-जानां तर; मी धुंदींत नाहीं समजलां? (पडत धडपडत जातो.)

परसो०—चला आपणही जाऊं पहाऱ्यावर.

जाधव० हे पाहिले पिलाजीराव! शिपाई म्हणजे असा बांका आहे, कीं दुसरा नानाजी. पण काय, या दुर्व्यसनानें गुणाची माती झाली. जितका गुण तितकाच दुर्गुण. वाईट वाटतें पण नाइलाज. सरदारकरांचा पूर्ण विश्वास आहे, परंतु एखादे दिवशीं अशा धुंदींत या बेटांत काय घोटाळा उडवील कोण जाणे.

परसो०—घेतात तरी केव्हां केव्हां?

जाधव०—रात्रीं. त्याशिवाय झोपच नाहीं यायची. बाकी चार चौघांत नाव जागत काढील.

परसो० ही गोष्ट सरदारकरांना कळविलेली बरी. कदाचित त्यांना माहित नसेल. अथवा त्यांचा दिल थोर असल्यामुळें ते यांच्या शिपाईगिरीवर खुष होऊन या व्यसनाकडे कानाडोळा करीत असतील. असेल कीं नाहीं?

( रंभाजी येतो. )

जाधव०— (यांच्याकडे पाहून.) कसं काय? चला पिलाजीरावांच्या पाठोपाठ चला. (हात धरून) चला, चला आधीं.

( रंभाजी जातो. )

परसो०—शिवाय सरदारकीसारखा जोखमीचा हुद्दा अशा ढिल्या माणसाकडे देणं हें सरदारकरसाहेबांनाही धोक्याचंच आहे; आणि असं त्यांना सांगणं कांहीं गैर नाहीं.

वाजवीत.) शिंग कोण वाजवितो! आतां, शहरभर कल्लोळ माजणार. काय हें मुनाळिकसाहेब? गम त्या–जन्माची काळजी लागेल.

(झुंजारराव येतो.)

झुंजार०— काय गडबड आहे?

परसो०—(रडकन) अरेरे! जबर जखम मरणार.

जाधव०—मुनाळिकसाहेब–परसोजीराव! करतां काय? कांहीं शुद्धीवर या. कोण आलं आहे पहा. कांहीं शरम धरा.

झुंजार० काय दंगा आहे? हा तंटा कसा सुरू झाला? खबरदार आतां कुणी हात उचलाल तर. आपल्यांत तंटे! तें शिंग जाऊन बंद करा आधीं. जाधवराव, तुम्ही कां दुःखानें करपून गेल्यासारखे दिसतां? सांगा, हा तंटा कसा सुरू झाला?

जाधव०—(दुःखी मुद्रा करून) मला कांहीं माहित नाहीं. हे दोघे मोठ्या गोष्टीगप्पांत थट्टामस्करी करीत होते; आणि इतक्यांत तरवारी उपसून एकमेकांच्या छातीवर चमकल्या काय झालं कुणाला ठाऊक. का ग्रहदशा फिरून वेड लागलं, काय सांगूं कारण? यांच्या तंट्यांत सांपडलों, त्यापेक्षां एखाद्या जंगी लढाईत हे पाय तुटते, तरी छान झालं असतं.

झुंजार०—कांहो पिलाजीराव, तुम्ही असे बेकाम कसे झालां?

पिलाजी०—धनीसाहेब, गुन्हा झाला खरा. माफी असावी.

झुंजार० परमोजीराव, तुम्ही मोठे सभ्य, गंभीर असा तुमचा लौकिक, शहाण्याच्या तोंडी तुमची तारीफ, आणि तुम्ही अशी आपली बेअब्रू करून घेतां. काय हें?

परमो० महाराज, मला जबर जखम झाली आहे. मला बोलवत नाहीं. माझ्याबद्दल जाधवराव आपल्याला सर्व हकीगत सांगतील. कुणी चालून आल्यावर आपला बचाव करणं हा जर गुन्हा असेल, तर इलाज नाहीं; पण याशिवाय कांहीं केलं नाहीं, बोलवत नाहीं -

झुंजार० अस्स! हा दंगा कसा सुरू झाला हें कळलं पाहिजे. गुन्हेगार माझा जुळा भाऊ असला, तरी त्याला जुमानणार नाहीं. काय हें! ज्या ठिकाणीं लढाईची धामधूम अजून पुरी मोडली नाहीं, लोकांची अजून भीति उडाली नाहीं, तिथें तुम्ही आपापसांत खासगी तंटेबखेडे, भररात्रीं सुद्धां चौकीवर चालवितां! माणसं आहां का हैवान आहां? जाधवराव, सांगा कुणी सुरुवात केली ती?

परमो०—जाधवराव, पिसाजीराव तुमचे दोस्त म्हणून, किंवा हुद्याचा संबंध मनांत आणून, जर त्यांची तरफदारी करून बनावट मजकूर सांगाल, तर तुम्ही खरे शिपाई नव्हेत.

जाधव०—अगदीं माझ्या काळजालाच नका हात घालूं हो. या जिभेनं पिसाजीरावाचं नुकसान होण्याचा प्रसंग आला, यापेक्षां ही जीभच जर कुणी छाटून टाकते, तर उत्तम होतं. तथापि खरं सांगण्यांत त्यांचं नुकसान होईलसं वाटत नाहीं. धनीसाहेब, खरी हकीगत अशी आहे, कीं मी आणि परमोजीराव कांहीं बोलत होतों;

इतक्यांत एकजण 'धांवा धांवा' म्हणून ओरडत आला. पिलाजीराव तरवार उपसून त्याच्या पाठीस लागले होते. हे परमाजीराव त्यांना थांबवायला म्हणून पुढें धांवले; आणि शहरांत गडबड उडूं नये म्हणून मी त्या पळत्या मनुष्याच्या मागोमाग निघालों. पण तो शेवटीं निसटलाच. इतक्यांत तरवारींचा खणखण आणि पिलाजीरावाचें तोंड चाललेलें ऐकून परत आलों, तों या दोघांची गुद्दागुद्दी, भोसकाभोसकी चालली होती, ती आपणच बंद केलीत. याहून जास्त कांहीं मला माहीत नाहीं. पण धनीसाहेब, मनुष्यें तीं मनुष्यंच; शहाणीं शहाणीं सुद्धां केव्हां केव्हां चुकतात. पिलाजीरावांकडून गुन्हा आला खरा, पण पळून गेलेल्या इसमानें, याची नक्कीच कांहीतरी बेअदबी केली असावी, म्हणून चमका येऊन हे त्याच्यावर तुटून पडले.

झुंजार० — समजलों. बरं तर चालायचं. आणि दोस्त तर राखायचा. म्हणून तुम्ही यांचा गुन्हा लहान करून दाखवितां. पिलाजीराव, तुमच्यावर लोभ आहे, पण तुम्हांला जरा नमण्याकरितां आजपासून तुमचा हुद्दा काढून घेतला आहे. कोण आहेरे? परमाजीरावांना नीट संभाळून नेऊन त्यांच्या जखमा बांधा. (घेऊन जातात.) जाधवराव, आतां शहरांत हिंडून कुणी गडबडले असतील, त्यांना धीर द्या; समजलांत? (जातो.)

जाधव० — (हात हालवून) मुसाहिबसाहेब, कुठें जखमबिखम झाली काहो?

पिलाजी० — फार जबर जखम झाली!

जाधव० — अरे! अरे! अरे! कुठें हो?

झाला, पण कां तें आठवत नाहीं. शिव शिव ! मनुष्यांनीं आपली अक्कल जावी म्हणून त्याला तोंडांत ओतायचा ! आम्हीं आपखुषीनं, आनंदानं, नेमानं जनावरं बनायचं !

**जाधव०**—कां, आतां तुम्ही चांगलं बोलतां, शुद्धीवर कसे आलां तर !

**पिलाजी०**—मद्यरूपी पिशाच निघून मनोरूपी पिशाच आमांत शिरलं म्हणून. म्हणजे एका दुर्गुणानं दुसरा दुर्गुण दाखविला; थू माझं जिणं !

**जाधव०**—चला, आपली नीति कायम करूं. मद्याचा वेळवखत मनात आणला, तर झालं हें चांगलं झालं; पण आतां काय त्याचं ! तेंच मुखापासून प्या म्हणजे झालं.

**पिलाजी०**—मला पुन्हां हजार वेळा प्या म्हणून मी असें करीन; पण तें म्हणतांना तूं लाजत आहेस ! आणि मग हजार तोंड असलीं तरी बरं ! एकदां शुद्धीत, एकदां धुंद, लगेच जनावर ! छे ! छे ! छे ! जनावराहून एक पेटा की मात आला ! कालकूट, नव्हे कालकूट !

**जाधव०**—चला हो, भलतंच ! चांगलं मद्य म्हणजे प्रत्यक्ष अमृत; उपयोग मात्र केला पाहिजे नसा. त्याची नका निंदा करूं बोवा ! तुम्ही काय आणि कुणी काय, कधींना कधीं येताल होतात. बर जाऊं द्या तें. पलटणकमांडर, मी तुमचा स्नेही म्हणून सांगतों. तुम्ही आतां असं करा—आपले सरलष्करसाहेब सध्यां माईसाहेबांच्या अगदीं मर्जीत आहेत. कारण त्यांचे गुण, त्यांचे लावण्य यांतच ते अहोरात्र गर्क असतात. तेव्हां तुम्ही जाऊन

बाकीनं. अहो पण उन्हाडलं. वेळेंत आणि उद्योगांत वेळ फार जलद जातो. तुम्ही जा आतां, चला---जास्त हकीगत पुढें कळेल. (त्याम इकलीन) हं चला—रामराम! (रभाजी जातो. दोन गोष्टी केल्या पाहिजेत. एक माझ्या बायकोकडून सरलष्करणीपाशीं पिलाजीरावाची गोष्ट काढविली पाहिजे; आणि दुसरी-शृंगारपुरवाल्या कुठें तरी गांठून, पिलाजीराव त्याच्या बायकोची पायधरणी करीत असतां, त्याला अचूक तिथं आणला पाहिजे, कसं? (आनंदानं) हो जुळलं, ठीक युक्ति. पण आळसानं, आणि बेगडपणानं बेत दिला पडू देऊन उपयोग नाहीं. (पळत जातो.)

अंक दुसरा समाप्त.

---

# अंक ३ रा.

## प्रवेश पहिला—किल्ल्यांतील सरलष्करचा वाडा. सकाळ.

(सरलष्कराच्या एका खोलींत हेबती व पिलाजीराव.)

पिलाजी०—अरे, मला एक काम करशील?

हेबती—सरदारसाहेबांचा पगार खाऊन तुमचं काम कशापायीं करूं?

पिलाजी०—ऐकून तरी घे.

हेबती—ऐकायचं तर म्हाईजी, कान वसल्याती.

पिलाजी०—(दोन नाणी मोहरा काढून दाखवून) आतां?

हेबती—हां! निघाल्या कानांतल्या दडया! बोला

तर्फेनं बोलणार आहेत. धनीसाहेबांचं म्हणणं तुम्ही ज्याला जवळ केलंत, तो इथं नानाफडणिसाचा असून, भोसल्यांचा संबंधी आहे: म्हणून तुम्हांला दूर करणं भाग पडलं. पण तेच पुन्हा म्हणाले, की त्यांचा माझा चांगला स्नेह आहे, रदबदलीची कांहीं जरूर नाहीं; तशी संधि आली, म्हणजे माझा मीच त्यांना कामावर बोलावीन. झालं

पिलाजी० तरी पण तुमच्या विचाराला येईल, आणि होण्यासारखं असेल, तर माईसाहेबांबरोबर थोडा वेळ बोलायची संधि आणून द्या.

सारजा—चला तर. या माझ्या मागून. एकदां गांठ घालून देतें; मग हवा तितका वेळ मन मोकळं करून बोला.

पिलाजी० —इतकं झाल्यावर आणखी काय पाहिजे? चला तर. (दोघंही जातात.)

प्रवेश दुसरा—त्याच वाड्यांतील खोली.

(कमळजा, पिलाजीराव आणि सारजा.)

कमळ०—मनासिक, तुम्ही अगदीं बिनघोर असा. माझ्या हातून होईल तितकी मी तुमच्याकरतां खटपट करीन. समजलां?

सारजा—माईसाहेब करतात एवढं. आमच्या घरीं सुद्धां स्वतः तसाच प्रसंग गुदरला, अशी तळमळ लागली आहे.

कमळ० का नाहीं लागणार? जगांत मनुष्यच चांगले. मनासिक, तुमचा नि तिकडचा अगदीं पहिल्यासारखा स्नेह जमवून देतें, मग झालंना?

पिलाजी०—आणखी काय साईसाहेब! आतां माझं कांहीं होवो; मी आपला जन्माचा बंदा गुलाम आहें.

कमळ०—मुतालिक, स्वारीवर तुमची भक्ति कशी आहे, दोघांचा परिचय किती दिवसांचा आहे, हें सर्व ठाऊक आहे मला. म्हणूनच म्हणतें, कीं कांहीं धोरणा-पुरतं तेवढं वांकडं; पुढें काय त्याचं?

पिलाजी०—पण, साईसाहेब, कदाचित् तें धोरणच इतकं लांबेल, किंवा चार दुसरे खटपाणी मिळून असं चाळ-वेल, कीं मी दृष्टिआड झालों आणि माझी जागा भरली म्हणजे माझ्या नोकरीचा आणि स्नेहाचा धनीसाहे-बांना विसर पडेल.

कमळ०—त्याची नको काळजी; या सारजाबाईस-मक्ष मी तुम्हाला तुमच्या जाग्याबद्दल वचन देतें. ही मात्र तुमची साक्षी असु द्या. मी एकदां मी वचन दिलं, म्हणजे तें शब्द न् शब्द खरं केल्याशिवाय सोडायची नाहीं. रात्रंदिवस पिच्छा पुरवून स्वारीचं मन वळवीन. खातां, पितां, उठतां, बसतां, नित्यशीं तुमच्या गोष्टी काढून त्यांना उत्साह आणीन. म्हणून म्हणतें, मुतालिक, आनंदांत असा; मी तुमची कायमची पतकरली आहे; मेलें तरी चालेल, पण तुमचा पक्ष सोडून सोडायची नाहीं.

सारजा०—साईसाहेब, स्वारी आली.

पिलाजी०—मी रजा घेतों तर.

कमळ०—कां? बसा तुमच्या देखतच गोष्ट काढतें.

पिलाजी०—आतां नको साईसाहेब; माझी तबेत जरा नादुरुस्त आहे. मी असून नसून सारखाच. म्हणून

कमळ०—बरं, मर्जी तुमची.

(झुंजारराव पुढें व जाधवराव मागून असे दुरून येतात.)

जाधव० - हां! हें नाहीं आपल्याला पसंत.

झुंजार० कायहो? काय म्हणतां?

जाधव० काहीं नाहीं धनीसाहेब; आणि जरी-पण काय म्हणत होतों विसरलों इतक्यांत.

झुंजार०—आतां तिच्यापासून गेला तो पिलाजीराव नव्हे का?

जाधव०- कोण? पिलाजीराव? छे! आपल्याला पाहून तो चोरासारखा छपून जायचा नाहीं.

झुंजार० मला वाटतं तोच तो.

कमळ०—(रडत व पिलाजीराव गेला तिकडे पहात,) हें पहा, एक अंमलदार दाद मागायला आला होता, त्याच्याशीं बोलत होतें—खरंच, आपली इतराजी झाली, म्हणून बिचारा अगदीं दीन झाला आहे.

झुंजार० कोण तो?

कमळ०—कोण म्हणजे, आपला मुतालिक, पिलाजीराव. हें पहा, माझी जर स्वारीजवळ काहीं भीड चालण्यासारखी असेल, तर बिचारा शरण आला आहे, त्याच्यावर मेहेरनजर करा. कारण मी त्याचीनं सांगतें, कीं त्याचा आपल्या ठिकाणीं खरा स्नेह आहे; त्याच्या हातून नकळत काहीं चूक घडली असेल. मुद्दाम त्यानं केलं काहीं नाहीं. हें माझं म्हणणं खोटं झालं, तर मुद्दलरून मला माणसाची पारखच करतां येत नाहीं असं म्हणायचं. म्हणून कीं नाहीं, माझ्याकरितां तरी त्याला परत बोलवावं.

झुंजार० —आतां इथून तोच गेला का?

कमळ०—होय तेंच. अगदीं गाय आहे बिचारा. त्याची ती स्थिति पाहून मला सुद्धां वाईट वाटतें. तर, (तिकडे न बघतांच आपल्या बायकोजवळ जाऊन कमळेच्या हातांतील रुमाल घेऊन तिला खुणेनें दाखवितो.) (त्याला बोलवा ना परत, अजून कांहीं लांब गेला नसेल. हं—

झुंजार०—आतां नको; मग केव्हां तरी पाहूं.

कमळ०—मग तरी लवकर ना पण!

झुंजार०—(कंटाळा धरून) हो हो! आपण जातीनें वकिली चालविली आहे, तेव्हां लवकरच बोलावूं तर.

कमळ०—तर मग आज रात्रीं?

झुंजार०—छेः! रात्रीं कशाला?

कमळ०—तर मग उद्यां पंक्तिलाच बोलवावे.

झुंजार०—उद्यां पण मी घरीं नाहीं जेवायचा.

कमळ०—बरें तर उद्यां रात्रीं? परवां सकाळीं? तेरवां कां होईना; पण कोणती ती एक वेळ ठरवावी. तीन दिवसांच्या पुढें मात्र नाहीं हो. शपथ! सांगतें, चुकी झाल्याबद्दल त्याला फार वाईट वाटतें आहे. आतां लष्करी रिवाजाप्रमाणें मोसमा पाहून त्याच्यावर हत्यार धरल्यावांचून दुसऱ्यांवर दरारा बसत नाहीं, असें म्हणतात तें बरोबर आहे; पण खरोखर मोजण्यासारखा त्याचा मुळीं गुन्हाच नाहीं, असं आपलं आम्हाला वाटतें हो. तर त्यानें केव्हां यावें सांगा पाहूं? काय मेलं! विलासीगरामासारख्या उत्तम, इमानी मनुष्याला परत बोलवायचें, इतकं अवघड पडलं अं! लग्नापूर्वी जेव्हां तो आपल्या तर्फेनें माझ्याकडे येई, तेव्हां जर मी त्याविरुद्ध एखादा शब्द

बोललें, तर लगेच भांडायला उठे. आणि त्याच्याविषयीं इतकी नेट ! मी असतें तर

शृंगार० पुरे आतां. त्याला पहिले तेव्हां येऊं द्या. आतां शब्द कसा मांडावा ? झालें आतां मनासारखं ?

कमल० आपल्या दोस्तालाच परत बोलवायचं, त्यांत माझ्या मनासारखं तें काय ? माझा का फायदा आहे त्यांत ? फायदा आपलाच.

शृंगार०—बरं, तसं का होईना. पण कृपा करून मला कांहीं वेळ सोडाल, तर बरं होईल.

कमल० आपली मर्जी मी कधीं मोडायची नाहीं; येतें तर.

शृंगार० हं, ये. मीही आलोंच तिकडे.

कमल० चला मारजाबाई. आपण कसेंही वागा, कसेंही असा, मला आपली आज्ञा प्रमाण (दोघी जातात.)

शृंगार० (तिच्याकडे पहात) किनमोल बायको आहे ! प्राण आहे माझा ! वाटेल, या सर्व जगाचा लय होईल, तरच तुझ्यावरचं माझं प्रेम नष्ट होईल.

जाधव० धनीसाहेब

शृंगार० काय जाधवराव

जाधव० आपलं मन बाईसाहेबांवर जडलं, ही गोष्ट पिलाजीरावांना लग्नापूर्वी समजली होती का ?

शृंगार० होहो ! अगदीपासून अखेरपर्यंत त्याला सर्व माहीत आहे. कां बरं ?

जाधव०—उगीच, शंका आली म्हणून विचारलं. कांहीं विशेष भानगड नाहीं, धनीसाहेब.

झुंजार० -कमळी शका हो!

जाधव० —नाहीं, मी समजत होतों, कीं मार्टिनसाहेबांनी आणि त्यांनी इतकी जानपछान नसेल.

झुंजार० --वाः, पुष्कळ. निरोपमुद्धां पोंचवीत असे तो एकमेकांला.

जाधव०—खरं?

झुंजार० खरं! खरं खरं. तुम्हाला कांहीं शंका येते की काय? शिवाजीराव सच्चा मनुष्य आहे.

जाधव० सच्चा? शिवाजीराव?

झुंजार० --हो सच्चा.

जाधव० धनीसाहेब, माझ्या माहितीवरून मला वाटतं—

झुंजार० —काय वाटतं?

जाधव० काय वाटतं?

झुंजार० - काय वाटतं, (आपल्याशीं) अरे! मी बोलतों तेंच काय बोलतो हा! याच्या डोक्यांत एखादी भयंकर कल्पना उत्पन्न झाली आहे, पण ती उघड करायला हा कचरतो. जाधवराव, तुमच्या मनांत कांहीं तरी आहे खास. जेव्हां शिवाजीराव निघ्यापासून गेला, तेव्हां म्हटलंत, 'हें नाहीं आवडल्याला पसंत!' काय नाहीं पसंत हो? नंतर 'तो निरोपमुद्धां पोंचवीत असे' असं मीं म्हटलं, तेव्हां 'खरं!' म्हणून केवढ्यानं ओरडलांत; आणि एखादी भयंकर कल्पना डोक्यांत भरावी, तसे भिवयांला नेट काय दिलेत, आंठ्या काय घालतयात; मुद्दा

काय फिरविलीत; तें कांहीं नाहीं; तुम्ही माझे खरे दोस्त असाल, तर मनांत काय आहे तें बोला.

जाधव० —दोस्त आहें कीं नाहीं हें आपल्याला माहीत.

शृंगार० अलबत; नुसते दोस्त इतकेंच नव्हे, तर तुम्ही मोठे नेकीचे मनुष्य असून, पुरा विचार केल्याशिवाय कांहीं बोलत नाहीं, हीसुद्धां माझी खात्री आहे; म्हणूनच तुमच्या या कचरत बोलण्याची धास्ती वाटते. हाच जर कोणी लबाड, लफंगा, बेइमान मनुष्य असता, तर त्याचं बोलणं मी लक्षांतच घेतलं नसतं; कारण त्याला अशा हिकमती लढविण्याची सवयच. पण तुमच्यासारख्या सच्चा मनुष्याची गोष्ट म्हटली म्हणजे, त्या कळकळीनं, आणि केवळ परोपकारबुद्धीनं उद्गार निघायचे.

जाधव० शिवाजीरावाविषयीं विचाराल, तर मी शपथेवर सांगेन, कीं तो सच्चा मनुष्य आहे.

शृंगार० मलाही तसाच वाटतो.

जाधव० —पण धनीसाहेब, मनुष्यं जशीं दिसतात, तशीं असावींत; अथवा जीं तशीं नसतील, त्यांनीं तसं दिसू नये हें चांगलें.

शृंगार० बरोबर, मनुष्यं दिसतात तशीं असावींत.

जाधव० म्हणूनच मी शिवाजीरावाला सच्चा म्हणतों.

शृंगार० नाहीं, यांत आणखी कांहीं तरी गोम आहे. जाधवराव, आतां जें असेल, तें दिल खुला करून सांगा. भलं असो, अगर बुरं असो, कसंही असो.

जाधव० धनीसाहेब, बोलतों याची माफी असावी. नोकरीच्या नात्यानं मी आपला बंदा गुलाम आहें; पण

गुलाम सुद्धां ज्यांत खुले त्यांत कांहीं मी आपला बंदा नाहीं. मनांत काय आहे तें सांगू? समजा, तें अगदीं खोटंनाटं आहे. हो-जसं राजवाडा झाला तरी त्यांत घाण दुर्गंधी ही असायचीच, तसच उत्तम मनुष्याच्याही मनांत चांगल्याबरोबर कांहीं वाईट विचार असायचेच आपले.

झुंजार० – जाधवराव, आपल्या मित्राचा घात होत आहे, असं समजून सुद्धां जर तुम्ही आपले विचार त्याला कळवीत नाहीं, तर तुम्ही त्याच्याशीं दगलबाजी करतां म्हणायचं.

जाधव० धनीसाहेबांना माझी एक विनंती आहे, कीं जरी माझ्या मनांत कुत्सित कल्पना येतात आणि मी स्वतः कबूल करतों–माझ्या स्वभावांतच असा दोष आहे, कीं दुसऱ्याचीं विगर्लिंग हुडकून काढायचीं, आणि मत्सरबुद्धीनं पुष्कळदां नसतीं किटाळं रचायचीं, तरी आपण कृपा करून माझ्यासारख्या मनुष्याच्या कच्च्या विसंगत कल्पनांवर लक्षच पुरवूं नये, आणि ज्या खात्री-लायक, मुद्देसूद गोष्टी नाहींत, त्या ऐकून भलत्याच घोटाळ्यांत पडूं नये. कारण त्या ऐकून आपल्याला ही समाधान किंवा फायदा व्हायचा नाहीं; आणि त्या सांगणं म्हणजे, माझ्याही मर्दपणाला, नेकीला अगर शहाणपणाला, रास्त नाहीं.

झुंजार० —तुम्ही काय म्हणतां तें स्पष्ट बोलतात ?

जाधव० —धनीसाहेब, पुरुषाला काय अगर बायकोला काय, अब्रू ही मोठी प्यार आहे. माझी संपत्ति

कुणीं चोरली, तरी तिची मला बिलकुल हळहळ वाटा-
यची नाहीं; कारण तिची किंमत ती काय! आज माझी, उद्यां त्याची, अशी ती हजारांची बटीक. पण जो माझ्या अब्रूला बट्टा लावतो, तो त्यापासून स्वतः श्रीमंत न होतां मला मात्र मरणाई बुडवितो.

अंगार० खरं, तुमच्या मनांतले विचार काढीन तेव्हां सोडीन!

जाधव०—धर्मसाहेब, माझं मन आपल्या हातीं असलं, तरी ते विचार ते नाहीत; मग माझ्याजवळ असतांना कसे निघणार?

अंगार० (आग्रह धरून) नाहीं सांगत?

जाधव०—हां हां! धर्मसाहेब, संभाळा, भलताच संशय घ्याल बरं! कारण संशयाच्या राक्षसी जबड्यांत एकदां सांपडलां, कीं आटपलं. कुणाची का बायको असेना, ती जर बाईलवेडीची निघाली, तर आपलं नशीब ओळखून तिचं नांव अगदीं मोडून देतो, तो सुखी; पण प्रीति ठेवून संशय घेतो, आणि संशय घेऊन जिवा जीव कीं प्राण करतो, त्याचं एकेक पळ किती दुःखानं जात असेल, धर्मसाहेब!

अंगार० शिव शिव! दुर्दशा!

जाधव०—धर्मसाहेब, दरिद्री असून ज्याला समाधान, तो खरा श्रीमान्; पण घरीं कुबेराची संपत्ति असून, मी दरिद्री होईन, मी दरिद्री होईन असा ज्याला सदा हृद्रोग, तो पुरा भिकारी. म्हणून परमेश्वरा! आमच्या मनांत बायकाविषयीं संशय म्हणून कधीं येऊं देऊं नकोस, बरं!

**झुंजार०**—(त्याच्या मनांतील काढण्याकरतां) कां बरें ? असं कां ? समजा कीं मला संशय आला; म्हणून मी आपला छद्रांग्यासारखा जन्मभर संशयांतच कुजत पडेन, असं तुम्हाला वाटतं ? असं कधीं व्हायचं नाहीं. संशय आला, कीं त्याचा निकाल लावलाच पाहिजे. नाहीं तर, तुमच्या सारखे वायफळ वहिमच घेत बसलो, तर मग पशूच बनलो म्हणायचा ! (हात मुरडून) हें पहा, माझी बायको देखणी आहे, सुगर आहे, कशिदा उत्तम काढते, गाते चांगली, तिला बोलायला फार पाहिजे, असं कुणी झालं, म्हणून मला तिच्याविषयीं भलताच संशय यायचा नाहीं; कारण तिचं आचरण शुद्ध. तिच्या ठिकाणीं हे गुण जास्तच खुलून दिसतात. बरं, मी तसा झोकदार नाहीं, म्हणून तिचं वाकडं पाऊल पडेल, असाही मला संशय यायचा नाहीं; कारण मी कसा आहें, हें पाहूनच तिनं मला माळ घातली. तें कांहीं नाहीं; जाधवराव, अगोदर नीट पाहिल्यावांचून मी संशय घ्यायचा नाहीं; संशय आला, की त्याची शहानिशा करीन. आणि सत्या-पत्यानिशीं जें ठरेल, त्याप्रमाणें एक संशयाला तरी फांटा देईन, किंवा प्रेमाला तरी देईन. समजलं ?

**जाधव०**—वा ! मग तर फार उत्तम ! आतां या बेताला, मोठ्या हौसेनं आणि नेटानं आपली नोकरी बजावायला जास्त जोर आला. त्याला मात्र आपण तयार रहा. (चोहोंकडे पहात) मुख्यपत्याविषयीं मी इतक्यांत बोलत नाहीं. एवढंच सुचवितों, कीं माईसाहेबांवर नजर ठेवा; पिल्लाजीराव आणि त्या एके ठिकाणीं असल्या, म्हणजे नीट लक्ष द्या; लक्ष द्यायचं तें केवळ संशयबुद्धीनंही नको

झुंजार० नाहीं जात.

जाधव०—हो, नाहींतर त्याचा परिणाम फार नाईट होईल. कारण शिपाईलोकांत माझे दोस्त आहेत. —पण धनीसाहेब, फार चळविचळ झालेली दिसते.

झुंजार०—नाहीं, फार नाहीं झाली; —माझी बायको पतिव्रता आहे असेंच वाटतें.

जाधव० त्या चिरकाळ तशा राहोत! आणि आपलाही ग्रह असाच राहो.

झुंजार० पण तिचा स्वभावच जर दुर्नीतिविरुद्ध—

जाधव०—बस्स, धनीसाहेब, इथेंच काय तें आहे. तुमचा राग येत नाहीं, तर बोलतों. बायकांचा स्वभाव म्हटला म्हणजे, गोरा, तरुण, रूपवान असा नवरा असावा; खरं की नाहीं? पण साहेबांना निराळाच पंथ! यावरून यांची नवर कामवासना, स्वतःचा आनंद आणि विचित्र कल्पना, ह्या सहज दिसून येतात. माफी असावी; मी हें त्यांनाच उद्देशून बोलत नाहीं; तरी न जाणो, कदाचित् एखादा गुलजार पुरुष बघून, आपल्याशीं लग्न केल्याबद्दल अजून त्यांचे मन पस्तावत नाहीं कशावरून?

झुंजार० बरं तुम्ही जा आतां. जा. जर कमजास्त कांहीं दिसलं, तर मला कळवा; आणखी, तुमच्या बायकोला सांगा तिच्यावर नजर ठेवायला; चला.

जाधव० बरं तर, येतों रजा धनीसाहेब. (जातो.)

झुंजार०—मीं आधीं लग्न का केलं? हा जाधवराव सांगतो, यापेक्षां त्याला खास जास्त माहीत आहे. (स्वस्थ राहतो.)

जाधव० (परतून) पुनः एकदां पायापाशीं विनंती करायची आहे, कीं या गोष्टीला जास्त खटा काढण्याच्या नादीं आपण पडूं नये; आपोआप काय होईल, तें होईल; आणि पिळाजीराव आपल्या कामांत चांगले वाकबगार आहेत, सबब त्यांची जागा त्यांना देणं जरी रास्त दिसतं, तरी आपल्या मर्जीस येईल, तर कांहीं दिवस त्यांना असेच ठेवावेत; म्हणजे ते फिरून जागा मिळवायला काय काय खटपट करतात, हें आपल्या ध्यानांत येईल. त्यांत विशेष इतकंच पहायचं, कीं त्यांच्याबद्दल माईसाहेब कितपत आग्रह धरतात, किंवा अजिज करतात, ध्यानांत आलं का? तात्पर्य मात्र, माझे हे फाजील तर्क आहेत असं समजून आणि असतील कदाचित माईसाहेब निष्पाप आहेत, असं धरून चाला, एवढीच विनंती आहे.

झुंजार०—ठीक आहे. त्याची नको फिकीर.

जाधव०—जातों तर, सरकारसाहेब. (जातो.)

झुंजार० हा जाधवराव पराकाष्ठेचा प्रामाणिक असून व्यवहारांतल्या सर्व खाचाखोंचा मोठ्या मार्मिकपणानें जाणणारा आहे. याच्या म्हणण्याप्रमाणें जर ती उनाड मैना आहे असं ठरलं, तर या हृदयाच्या पिंजऱ्यांत जरी तिला ठेविली आहे, तरी त्यांतून मुद्दां बाहेर हुसकावून लावीन; मग पाहिजे तिकडे जाईना. आता कदाचित मी काळा आहें, माझ्या अंगांत मिठास रंगेल भाषणाची खुबी नाहीं, तसेंच हे वाळ संपत दिसूं लागले.—पण हें कांहीं खरं कारण नव्हे. —कांहीं असेना, ती बिघडली हें खास; आणि मी सफाई फसलों; आतां तिचं नांव टाकून दिल्यावांचून समाधान मानायला तोंड

नाहीं दुसरी. ह्याचा परिणाम असाच व्हायचा: कीं या नाजुक जिवल्यांना ' आमच्या ' म्हणण्यापुरतीच आम्हांला सत्ता; यांच्या मनावर कांहीं आपला अम्मल नाहीं. ज्या-ठिकाणीं माझी प्रीति, तिथेंच एका कोपऱ्यांत, दुसऱ्याचें बिऱ्हाड ! यापेक्षां एखादा बेडूक होऊन मोरीची घाण घेत पडलों असतों, तरी बेहत्तर होतें. पण थोरांच्या भाग हें शुष्ककाष्ठ असायचेंच; जसा मृत्यु, तसं हें कधीं टळायचें नाहीं: अगदीं ब्रह्मदेवाचा लेख. या बाबतींत लहा-नांपेक्षां थोरांचा हक्क जास्त. ही आली पहा. ही जर जारिणी असेल, तर त्यांत प्रत्यक्ष सौंदर्याची विटंबना ! मी कांहीं तें खरं मानायचा नाहीं.

( **कमळजा** व **सारजा** येतात. )

**कमळ०**—तिकडे नगारी झाली, उठायचं नाहीं का ? बोलावलेली सर्व मंडळी केव्हांची येऊन बसली आहे; आतां स्वारीकडूनच उशीर.

**झुंजार०**—हो, उशीर झाला जरा थोडा.

**कमळ०**—अगबाई ! आज आपला शब्द हलका कां बरं येतो ? प्रकृती बिघडली आहे कीं काय ?

**झुंजार०**—हो, जरा कपाळ दुखतं आहे. हें—या इथं.

**कमळ०**—बरोबर; तें जाग्रणानं दुखत असेल. या रुमालानं बांधलें, म्हणजे आतां एका घटकेंत बरं होईल.

**झुंजार०**—नको, तो फार लहान आहे. (रुमाल टाकतो व तो खालीं पडतो.) राहील तसंच, चला जाऊं.

( **झुंजारराव** व **कमळजा** जातात. )

**सारजा**—( पडलेला रुमाल उचलून आनंदानं ) हा रुमाल

सांपडला, बरं झालं. आमच्या मंडळांनीं हा चोरून आण, म्हणून मला एक शंभरदां मागितलं होतं. पण माईसा- हेबांना याच्यावर फार जीव. धनीसाहेबांनीं त्यांना ही पहिली प्रेमाची खूण म्हणून दिला आहे, आणि नीट सं- भाळ असं बजावून मागितलं आहे. त्या याला एक क्षण- भरसुद्धां विसरत नाहींत, नेहमीं पोटाशीं बाळगतात, त्याचे मुके घेतात. तर याच्यावरची एखादी वेलबुट्टी उत- रून घेऊन, मग त्याशांना देईन; ते याचं काय करणार आहेत ईश्वर जाणे! आपल्याला काय, त्यांनीं मागितलं तें करायचं.

(जाधवराव येतो.)

जाधव०—का? इथं एकट्या काय करतां?

सारजा—असं दटाऊं नका; आता आपल्या मना- सारखं झालं आहे.

जाधव०—तें कधींच झालं आहे.

सारजा—तें काय?

जाधव०—हेंच, आपल्यासारखं रत्न मिळालं हें!

सारजा—इतकंच का समजलं? बरं मी आपल्याला तो रुमाल दिला, तर मला काय द्याल?

जाधव०—(उत्सुकतेनं) तो रुमाल कोणता?

सारजा—कोणता म्हणजे! (हास्य) धनीसाहे- बांनीं माईसाहेबांना खूण दिला होता आणि आपण मला चोरून आणायला सांगितला होता, तो-तो!

जाधव०—मग तो त्यांच्यापासून चोरून आणलास कीं काय!

सारजा—चोरून नाहीं; माईसाहेबांच्या हातांतून

गडबडींत खालीं पडला, आणि लाभकाळाची गोष्ट, मी निथंच होतें, तो उचलून घेतला; हा पाहिलात का ?

जाधव० -शाबास! अशी असावी बायको. दे तो इकडे. (घेऊं लागतो.)

सारजा—(मागें सरत) पण मला इतक्या अगत्यानं चोरून आणायला सांगितला, तर याचं करणार काय आपण ?

जाधव०—(हिसकाऊन घेऊन) इकडे आण. तुला काय त्याचं ? करणार काय म्हणे !

सारजा--नाहीं म्हटलं, जर आपल्याला त्याचं मोठंसं काम नसलं, तर मला परत द्या, म्हणजे मी त्याचा त्यांना परत नेऊन देईन. उगीच वेड्यासारख्या इकडेतिकडे शोधीत बसतील, म्हणून म्हणतें.

जाधव० - बर बर, समजलं! पण सापडला म्हणून कुणाला कळवूं नकोस बर का. मला काम आहे त्याचं. जा आतां. (ती जाते.) आतां हा रुमाल मी पिलाजीराबाच्या घरीं त्याला सांपडेल अशा ठिकाणीं नेऊन टाकतों. संशयखोराला अगदीं क्षुल्लक कारणसुद्धां बळकट दिसतं, तेव्हां या रुमालाचा कांहीं तरी उपयोग होईल. माझ्या विषाचा अम्मल झुंजाररावावर चांगला चालू झाला आहे. हें भयंकर कल्पनारूपी विष घेतांना, कांहीं इतकं कडू लागत नाहीं; पण एकदां रक्ताशीं भिनलं, कीं आग भडका उडवून देतं. मीं म्हटलं तें खरचं. (आनंदानं) हीं पहा स्वारी आली! आतां तुला कुठली झोंप. भांग, गांजा, अफू अगर गुंगी आणणारीं जगांतलीं पाहिजे तीं

आणखी ना; पण काय जशी तुला मासल्यांत लागली होती, तशी फिरून कधीं लागायची नाहीं.

( झुंजारराव येतो. )

झुंजार०—माझ्याशीं दगलबाजी !

जाधव०—( नमस्कार करून ) पण धनीसाहेब, त्याविषयीं पुन्हा गोष्ट काढायची नाहीं.

झुंजार०—कोण ? चला चालते व्हा ! तुम्ही माझ्या सर्वांगाचा भडका करून टाकला आहे. असं थोडं थोडं सांगण्यापेक्षां एकदम सांगणं बरं.

जाधव०—म्हणजे काय हें, धनीसाहेब !

झुंजार०—( आपल्याशीं बोलू-लागल्याप्रमाणें ) तिनं चोरून जारकर्म केलं हें मला ठाऊक होतं का ? तें मीं पाहिलं नाहीं, त्याची कल्पना नाहीं, अर्थात् त्यानं दुःखही झालं नाहीं. कालपर्यंत कशी गाढ झोंप लागली होती; निश्चयानें जागली, बोलली, हंसली, खेळली, पण पित्लागीराचा शिक्का तिच्या गालावर कुठें दिसला नाहीं. हें पहा, चोरीस गेलेला जिन्नस मालकाला कळण्यासारखा नसेल, तर चोरी झाली. हें त्याला कळूं नये, म्हणजे त्याला जिन्नस गेलाच नाहीं.

जाधव०—आपणच असं म्हटल्यावर मग काय !

झुंजार०—मला न कळतां, लष्कराच्या सर्व लोकांनीं तिचा उपभोग घेतला असता, तरी मी आनंदांत चैनीत राहिलों असतों. पण आतां आनंद, चैन, समाधान सर्व गेलं ! मुकलों मी त्यांना. फक्त हुकमाची वाट, कीं ज्यांनीं शत्रूवर एकदम तुटून पडावं, असे माझे रणबहादुर शूर शिपाई, तसेच भाला बर्ची कमानवाले उमदे शिले-

दार, ज्यांच्या रणमग्न योद्धयांना शिकाळा ऐकून शत्रूच्या फौजेची दाणादाण उडून जाई, त्या सर्वांना मी अंतरलों. त्याप्रमाणें अगांत वीरश्रीचा संचार व्हावा, असा डंके नोबतींचा 'धुडुं धुडु' आवाज, कानठाळे बसविणारा शिंगाचा शब्द, तमाम कर्ण्यांचा घनघोर भुंकार, पुन्हा माझ्या कानीं पडायचा नाहीं. तीं अफाट रणमैदानें, तो भगवा झेंडा, त्या भयंकर गडगडाट करणाऱ्या तोफा, तो लष्करी ख्वाजमा. डामडौल, ती वीरश्री, ती कीर्ति, या सर्वांना-सर्वांना माझा शेवटचा रामराम! या शृंगाररावाच्या शिपाईपेशाची अखेर आली. (रडून कोचावर बसतो.)

**जाधव०** पण असं होईल कसं, धनीसाहेब?

**शृंगार०**--चांडाळा, माझी लाडकी बदचाल आहे, ही गोष्ट तुला शाबीत करून दाखविली पाहिजे. समजलास! अशीतशी नव्हे. प्रत्यक्ष मला दाखविली पाहिजेस; नाहीं तर (त्याचा गळा धरून) याद ठेव हा शृंगारराव आहे, आणि तूं आहेस!

**जाधव०** अखेर या पलंग्याला गोष्ट येऊन ठेपली का?

**शृंगार०** प्रत्यक्ष मला दाखीव, अगर माझी अशी खात्री कर, की संशयाला म्हणून बिल्कुल जागा राहू नये. असं न केलंस, तर नरडीचा घोट घेईन तुझ्या.

**जाधव०**—पण धनीसाहेब—

**शृंगार०**—आणि जर तूं निव्वळ हें खोटंच कुभांड रचून, माझ्या आगाचा विनाकारण भडका उडविला असल्यास, तर तुला रौरव नरकाशिवाय दुसरी गति नाहीं. कारण घोर-घोरकर्माचा इथं कडेलोट झाला.

जाधव० शिव शिव! हे सर्वसाक्षी परमेश्वरा! तुझे डोळे आहेत! धनीसाहेब, आपण शुद्धीत बोलतां का हें? बस्स-बस्स झाली नोकरी आता! या उप्पर सोडवा मला इथून. काय मी मूर्ख पहा! हा गधड्या जाधवराव! प्रामाणिकपणा हा दुर्गुण, असं ठरवायला जिवंत राहिलास तूं! काय जगाची रहाटी विलक्षण आहे! जगा! सरळ प्रामाणिकपणानं वागण्यांत धोका आहे रे! संभाळ. महाराज. ही अक्कल आपण शिकविली मला. फार उपकार केलेत. आजपासून कोणत्याही मित्राशीं सरळपणानं म्हणून वागायचं नाहीं; कारण त्याचं असं बक्षीस मिळतं. (जाऊं लागतो.)

झुंजार०—नाहीं—थांब तुला सरळपणानं वागलंच पाहिजे.

जाधव०—नाहीं धनीसाहेब, मला शहाणं झालं पाहिजे; कारण सरळ मनुष्य म्हणजे मूर्ख ज्यासाठीं धडपड करतो, तेंच गमावून बसतो.

झुंजार०—माझी बायको शुद्ध आहे, असंही वाटतं, नाहीं असंही वाटतं; तसंच तुझी खरे अहांत असंही वाटतं, नाहींत असंही वाटतं; बस्स पुरावा पाहिजे; काहीं तरी पुरावा पाहिजे. तिच्या शुद्ध मुखचंद्राला कलंक लागून माझ्या तोंडाप्रमाणं काळं ठिक्कर पडलं, हें मी कसं सहन करूं? फास, जंबीया, जहर अगर बुक्या, इतके उपाय असून, तें मी कसं सहन करूं? खात्री मात्र झाली पाहिजे!

जाधव० आपण रागानं अगदीं खवळून गेलां आहां असं दिसतं, आणि याला कारण मीच झालों, म्हणून फार वाईट वाटतं; कसं म्हणतां? खात्री पाहिजे?

झुंजार०—खात्री पाहिजे! केलीच पाहिजे.

जाधव०—ठीक आहे, ध्या करून. पण धनीसाहेब, खात्री कशी करून घेणार? निर्लज्जासारखे असा आड करून पहात उभे रहाल तिकडे?

झुंजार० (कान झाकून डोळे मिटून) कडकडून प्राण जाईल!

जाधव०—आणि तशा स्थितींत तीं दिसायचीं म्हणजे सुद्धां महा यातायात. कारण असलीं कर्मं नेहमीं अंधारांतच व्हायचीं. मग कस नर! काय करायचं? खात्री कशी व्हायची! तीं दोघं कितीही बेशरम-बेफाम झालीं, तरी आपल्या दृष्टीस कांहीं तें कृत्य पडायचं नाहीं. आतां, घट डोळ्यांशीं नेऊन भिडवणारा असा सक्कम पुरावा पाहिजे असेल, तर हाजर करतों.

झुंजार०—तिला गर चाबकाची लागायला, एखादं तिनतोंड कारण दाखीव म्हणजे बस्स.

जाधव०—हरकत नाहीं. जरी हें काम मनापासून मला आवडत नाहीं, तरी केवळ भोळसटपणानें, स्नेहासाठीं म्हणून एकदां अंगावर घेतलं आहे, तें शेवटास नेलंच पाहिजे. धनीसाहेब, लक्ष असावं मी सांगतों इकडे, परवां एकदां मी पिलाजीरावाशेजारीं पडलों होतों; पण ही दाढ ठणकत होती, म्हणून झोंप कांहीं आली नाहीं. हें आपल्याला ठाऊक असेलच, कीं दिवसा केलेलं स्वप्नांत बडबडणारीं कांहीं ढिलीं माणसं असतात, त्यांतलेच आमचे पिलाजीराव; त्यांचं बडबडणं चाललं होतं. कीं मग कमळे, आपला हा संबंध मोठ्या सावधगिरीनं जपून चालविला पाहिजे बरं. आणि मग त्यांनीं मला कवटाळून मिठी

मारून टाकलं अहाहा! बर्फाचा तुकडा आहे! नंतर जो मुक्यांचा सपाटा चालविला म्हणतां; मला वाटलं, माझ्या गालाची कांहीं आता धडगत दिसत नाहीं. तें झाल्यावर सुस्कारा टाकून म्हणाले, प्रिये तुझं नशिब खोटं, म्हणून तूं त्या झुंजाररावाच्या हातीं लागलीस!

झुंजार०—अरे चोरा!

जाधव० धनीसाहेब, पण हें खरं नव्हे-ही त्याच्या स्वप्नांतली गोष्ट.

झुंजार०—पण पूर्वी ठरलेला बेत यावरून दिसतो कीं नाहीं? आणि स्वप्न असलं तरी संशयाला आधार चांगला झाला.

जाधव०—शिवाय दुसरीं जीं लबाडीचीं प्रमाणं आहेत, त्यांना जोर आला.

झुंजार० ठीक आहे, आतां तिच्या चिंधड्या उडवितों पहा.

जाधव० धनीसाहेब, दमानं घ्या; आपण प्रत्यक्ष कांहीं पाहिलं नाहीं; त्या अजूनही कदाचित् बिघडल्या नसतील. पण हो, आपण कधीं बाईसाहेबांच्या हातांत, मधें एक स्वस्तिक काढलेला, रुमाल पाहिला होता का? बाजूला सुरेख वेलबुट्टी आहे पहा.

झुंजार० – हो, तो दस्तरुमाल मींच तिला दिला होता.

जाधव० तें मला ठाऊक नाहीं, पण तो दस्तरुमाल बाईसाहेबांचा यांत शंकाच नाहीं. तो मीं आज पिलाजीरावाच्या हातांत पाहिला.

झुंजार० जर तोच असला—

जाधव०—तोच असो, किंवा त्यांच्यापैकीं दुसरा असो; पण बाकीच्या पुतळ्यांत हीं एक आपली भर.

झुंजार० (रागानें) अहो त्या हरामखोराचा चाळीस-हजार देह पाहिजे होते हो एक देह म्हणजे काय निळ्यामारख्या माझ्या क्रोधाच्या दाढेला पुरा पुरायचा नाहीं. आतां मला सर्व खरं भासूं लागलं. जाधवराव, ही पहा, तिच्यावरची सारी वेडी प्रीति फुकून टाकली, पार! या उप्पर साधेल तितका दावा साधीन.

जाधव० - पण थोडी शांति धरा.

झुंजार० शांती कसली आतां! प्राण घेतो तिचा. (जाऊं लागतो.)

जाधव० पण इतकी घाई करूं नका; कदाचित् मन पालटेल म्हणून म्हणतों.

झुंजार० कधीं पालटायचं नाहीं. पुरा दावा साधीन; माझ्या क्रोधाग्नींत त्या दोघांच्या आहुती देईन. हीच माझी प्रतिज्ञा. (जाऊं लागतो.)

जाधव०—थांबा धनीसाहेब; मीहि सर्व देवासमक्ष प्रतिज्ञा करतों, कीं माझं ज्ञान, माझं मन आणि माझे हात हीं आजपासून याच्या सेवेंत राहिलीं. याचा हुकूम मात्र व्हावा, मग कसलेंही अघोर कृत्य असो, तें मी करीन!

झुंजार० शाबास! खरे दोस्त! पण तुमची शाबासकी देत नाहीं, तर लागलीच कामगिरीही सांगतों. ऐका आजपासून तीन दिवसांच्या आंत पिराजीराव ठार झाला, ही खबर तुम्ही मला सांगितली पाहिजे.

जाधव० (दुःखी मुद्रेनें) हर हर! आपल्या हुकुमा-

णल्याशिवाय, मी आतां जाऊन यायची नाहीं. (शृंगारराव गेला.) का? अम्मळ बरं वाटतं का आतां?

शृंगार० (गाल दाबून) हो. बरं वाटतं. (थांबून) मनांत एक आणि बाहेर दाखवायचं एक फार कठीण. (तिच्याकडे वळून) तुमचं काम काय?

कमळ० माझं काय असायचं?

शृंगार० जरा तुझा हात दे पाहूं. (हात पाहून) हा हात स्निग्ध असून चांगला लुसलुशीत आहे.

कमळ० अजून तितकं वयही झालं नाहीं. शिवाय कांहीं कष्टाचीं कामंही करावीं लागत नाहींत, म्हणून तसा आहे.

शृंगार० (हातावरच्या रेषा पहात पहात) उदारबुद्धि आणि विशुद्ध मनची यांचं लक्षण आहे हें. असा नरम, गरम, स्निग्ध हात असला, म्हणजे त्याला परमेश्वरच. उपासतापास, देहदंड, तपश्चर्या. हे उपाय केले पाहिजेत; कारण या लक्षणावरून तरुण मनुष्यांचं मनचांचल्य आहे, तेंच फार गोंधळ उडवितें. हात चांगला यांत संशय नाहीं.

कमळ० आपल्याला असं म्हटलंच पाहिजे; कारण याच हातानं आपण माझं पाणिग्रहण केलं.

शृंगार० मोठा उदार हात. पहिल्या बायकोला मनोदान करून, मग पाणिदान करीत असत; पण अलीकडच्या बायका नुसते हात देतात, मन नाहीं.

कमळ० यावर कांहीं माझ्यानं बोलवत नाहीं. पण आपलं वचन?

शृंगार० तें कोणतं?

झुंजार० थस्स, रुमाल ! रुमाल !

कमळ० खरं झालं तर दोष आपल्या पदरीं येतो.

झुंजार० चल-निघ ! ( जातो. )

सारजा खरी संशयखोर नाहीं म्हणत होतां ना !

कमळ० असं वाटे मी पूर्वी कधीं पाहिलं नव्हतं. खरंच, त्या रुमालांत कांहीं चमत्कार आहे खरा. तो हरवला हें फार वाईट झालं बाई.

सारजा बाईसाहेब, पुरुषाची परीक्षा एक दोन वर्षांत होत नाहीं. पहिल्यापहिल्यानदां त्यांना आमची अगदीं भूक असते, पण एकदां तृप्ति झाली, कीं संपलं. हे पहा पिलाजीराव आणखी

( जाधवराव व पिलाजीराव येतात. )

जाधव० — निश्चय कांहीं दुसरा मार्ग नाहीं; बाईसाहेबांच्याच मार्फत काम झालं पाहिजे. ( कमळेस पाहून ) अरे वा: ! काम फत्ते ! ह्या पहा बाईसाहेब जाऊन घट्ट पाय धरा.

कमळ० कां पिलाजीराव ? कांहीं नवल विशेष ?

पिलाजी० आहे तेंच आहे बाईसाहेब; पण आतां पायांजवळ इतकाच अर्ज, कीं धनीसाहेबांची माझ्यावर पुन्हा मेहेरनजर होऊन मी या जागीं यावं, हें आपल्या हातीं आहे. त्यांचरणीं मात्र पडूं नये. किंवा माझी झालेली नोकरी, सध्याचे हाल, आणि पुढें होणारी नोकरी या सर्वांवर पाणी पडण्यासारखाच माझा भयंकर गुन्हा असेल, तर तसं तरी कळलं तर; म्हणजे मारून मुटकून समाधान मानून, दैवावर हवाला टाकून, दुसरा एखादा रस्ता पाहीन.

त्यांच्या नजरेस हा प्रकार पडण्यांत काही भूषण नाहीं मला.

**चंपाजी**—हें का! मी नकोशी झालें म्हणून ना? समजलं, समजलं. एवढी चार पावलांची तसदी घेऊन मला रस्त्याला लावा, आणि रात्रीं तरी लौकरच पायधूळ झाडाल कीं नाहीं, तें सांगा म्हणजे झालं.

**पिलाजी०**—चार पावलं पोंचवितों; रात्रीं मात्र लवकर येईन. जा आतां.

**चंपाजी**—ठीक आहे. आम्हांला काय, प्रसंग येईल तसं वागायचं. रात्रीं तरी यावं ना? नाहीं तर पहा.

(पडदा पडतो.)

अंक तिसरा समाप्त

---

# अंक ४ था.

## प्रवेश पहिला. स्थळ पूर्वीचें.

(झुंजारराव व जाधवराव येतात.)

**जाधव०** आपल्याला वाटलं का असं?

**झुंजार०** असं म्हणजे कसं?

**जाधव०** परपुरुषाला चोरून चुंबन देणं?

**झुंजार०** बिलकूल नाहीं स्वप्नांत.

**जाधव०** किंवा त्याच्या शेजारीं चार चार तास बिछान्यावर असणं? वाईट बुद्धीनं नव्हे काहीं.

**झुंजार०**—बिछान्यावर शेजारीं असून, वाईट बुद्धीनं नव्हे? सवाई ढोंग हें. असं कधीं व्हायचं नाहीं. आरंभीं जरी मन पाक असलं तरी अशा प्रसंगीं तें ढळायचंच.

जाधव० वास्तविक तर तसा प्रकार घडला नाहीं, तर काहीं मोठासा अपराध नव्हे हा. परंतु मी माझ्या बायकोला एक रुमाल दिला असं समजा–

झुंजार० बर मग?

जाधव०—मग काय? तो तिचा झाला. तिनं तो पाहिजे त्याला द्यावा.

झुंजार०—वा, पातिव्रत्यही तिचंच, म्हणून तेंही द्यावं का?

जाधव० धर्तासाहेब, पातिव्रत्य ही दिसणारी वस्तु नव्हे. वास्तविक पतिव्रता नसतात, त्याच केवळ पतिव्रता म्हणून गाजतात. पण रुमालाची गोष्ट–

झुंजार० देवा शपथ! मला त्याचा विसर पडता, तर बरं होतं! घरावर घुबड बसावं, त्याप्रमाणं तो दुश्चिन्हासारखा मला दिसतो. तुम्हीं म्हटलंत माझा रुमाल त्याच्याजवळ होता.

जाधव०—हो, पण त्याचं काय आतां?

झुंजार० त्याचं काय आतां! हें नाहीं रास्त.

जाधव० बरं समजा, मीं असं म्हटलं असतं, कीं त्यानं आपल्या घरीं काहीं खटपट केलेली मीं पाहिली, किंवा त्यानं सांगितलेलं ऐकलं, तर काय केलं असतंत? कारण असे गडी पुष्कळ सापडतील, कीं आपण होऊन अगर स्त्रियांच्या लवळपट्टीनं, ते एखादीवर फिदा झाले, म्हणजे ही गोष्ट त्यांच्या तोंडून बाहेर फुटायचीच,

झुंजार०—तो असं काहीं बोलला का?

जाधव० बोलला. पण दुटप्पी बोलला.

झुंजार०—काय काय बोलला!

जाधव०—मी असं असं केलं असं बोलला,

झुंजार०—तिच्याशी?

जाधव०—(कुत्सित) तिच्याशी-तिच्याशी.

झुंजार०—समजलों. रुमाल रुमाल माझ्या अंगाला थरथराट झाला आहे! यांत काहीं तथ्य असल्यावांचून नुसत्या शब्दांनी मनाला इतका संताप व्हायचा नाहीं. अगदीं नाकाला नाक, व तोंडाला तोंड! (मंद्र घेऊन) असं होईल कसं? रुमाल रुमाल-(मूर्छित होऊन पडतो.)

जाधव०—(बाकडे पाहून) माझी मात्रा लागू पडली. चालूं दे. भोळे बैलोबा फसतात ते असेच; आणि कैक शुद्ध पतिव्रतांना जारकर्माचा खोटा डाग लागतो, तोही असाच—(मोठ्याने हाक मारून) धनीसाहेब! काय झालं! धनीसाहेब! (पिलाजी येतो.) का पिलाजीराव?

पिलाजी०—काय झालं हो यांना?

जाधव०—फेफरं आलं आहे—दुसरा झटका हा; काल एक असाच आला होता.

पिलाजी०—(पुढे सरून) जरा कानशिलाशी चोळा तर.

जाधव०—(हात धरून) छे! छे! त्यानं नाहीं उपयोग. फेफरं म्हटलं म्हणजे त्याला आपल्या स्वस्थ पडूं दिलं पाहिजे; नाहीतर तोंडाला फेस सुटून काहीं वेळानं तो बेफाम होऊन जातो. हे पहा हलायला लागले. तुम्ही जरा चला इथून, आतां सावध होतील; ते गेल्यानंतर तुम-च्याशीं काहीं जरूर बोलायचं आहे ना. (तो जातो) धनीसाहेब! काय हे! देवानं असलं तें मर्दासारखं सोसलं पाहिजे.

( जाधवराव व पिलाजीराव हळू हळू बोलतात. )

झुंजार० ( आपून ) नाहीं म्हणतो—इशाऱ्याखालीं नेतो!

जाधव० ( अनायासाम ऐकून ) पण काहो पिला- जीराव, तुम्ही तिला कायमची ठेवून देणार म्हणते ती, खरं का?

( पिलाजी मोठ्यानें हसतो. )

झुंजार० अरे चोरा! हंसतोस काय!

पिलाजी० तिला मी कायमची ठेवणार! वाः! म्हणजे माझी अक्कल आजच गेली असं समजतां कीं काय? ( मोठ्यानें हसतो )

झुंजार० ज्याचं काम फत्ते होतं तोच हसतो.

जाधव० खरंच; बाजार बातमी तर अशी आहे.

पिलाजी० अहो तिनंच गप्प उठवली ही तिच्या मनातून आहे, पण आपण कांहीं बोललों नाहीं. आतां आली होती इथं. जिवंतपणीं तिथं आपली ही आहेच. परवा काय झालं. ( जाधवरावास अंजारास हातानें खुणावतो. ) ऐकलंत का जाधवराव. परवां मी चंद्रावर कुणाशीं बोलत होतो. आणि इतक्यांत आलं तुझं हें ध्यान! आल्या बरोबर एकदम गळ्यालाच मिठी!

झुंजार० तस कांहीं ' सख्या जिवलगा ' म्हणूनच, असं याच्या तोंडावरून दिसतं.

पिलाजी० आणि मग बोलली काय, रडली काय, मला ओढलं काय, आवळलं काय, कांहीं सोय नाहीं.

( दोघे हळू हळू बोलतात )

झुंजार०—आतां सांगतो आहे, तिनं मला खोलींत

कसं नेलं. अरे बेरडा! वो देखा लेकिन वइसा नहीं देखा!

पिलाजी०—गम्मत! पुरे आतां तिची संगत.

जाधव०—पण समोर पहा कोण येत आहे तें.

पिलाजी० (बाजूस तोंड करून) ही एक दुसरी लाव-सट आहे! पण तिच्यापेक्षां चांगली. (चंपा येते, तीस) तूं कां अशी माझ्या मागं लागली आहेस?

चंपाजी—माझं खेटर लागलं आहे तुमच्या माग! (रुमाल पुढे करून) आता तुम्हीं मला हा रुमाल दिलात, तो काय म्हणून? मी वेडी म्हणून तो घेतला. त्याच्यावरची वेलबुट्टी मी काढू का? हा म्हणे 'माझ्या खोलीत मला सांपडला, आणि कुणी आणून टाकला तें काहीं माहीत नाहीं.' वाः! कुणी तरी मेल्या सवतीनं दिला असेल, आणि त्याच्यावरची वेलबुट्टी उतरायला मला सांगतात! खासं! घ्या हा आपला रुमाल. (रुमाल फेकते) आणि द्या त्या माझ्या सवतीला नेऊन. मी नाहीं असलं मोलकरणीचं काम करीन, समजलां?

झुंजार० खास! खास! माझाच रुमाल हा!

पिलाजी० (उचलून) हें काय बरं चंपाजी, हें काय?

चंपाजी—(रागानें) तेंच हें. असलं रात्रीं यायचं, तर याः नसल तर मर्जी लागेल तेव्हां या. (जाते.)

जाधव०—(झुंजाररावास रागानें येतों आहे असें पाहून) चला—चला, मागून चला तिच्या.

पिलाजी०—गेलच पाहिजे; नाहीं तर मान्या रस्ता-भर तोंड चालेल.

जाधव० रात्रीं मुक्काम तिच्याच घरीं असेल ?

पिलाजी० —हो, असा बेत आहे.

जाधव० बरं तर, रामराम! तुमच्याशीं काहीं बोलायचं आहे; कदाचित् मी ही येईन तिकडे.

पिलाजी० तुम्ही का? यायचं तर रामराम! (जातो.)

झुंजार० (पुढें येऊन) जाधवराव त्याचा प्राण कसा घेऊं बोला.

जाधव०—आपल्या बदकर्माबद्दल कसा हंसत होता, पाहिलंत ना? आणि तो रुमाल –

झुंजार० माझाच का तो?

जाधव० होय सर्दारसाहेब; आणि साईसाहेबांची तरी त्याच्याजवळ काय किंमत आहे तें पाहिलंत? त्यांनीं त्याला दिला, आणि त्यानं आपल्या रांडेला दिला!

झुंजार०—(स्वगत) असं वाटतं, कीं हालहाल करून त्याला प्राण घ्यावा. (उघड) बायको काय पण! रूप शानदार! रूप गुणी! फारच गोड!

जाधव० पण सर्दारसाहेब, तें विसरायचं आतां.

झुंजार० (स्वगत) आज रात्रीं तिचा नायनाट करतों, मुडदा पाडतों. कारण हें पहा माझं हृदय काय शुद्ध पाषाण बनलं आहे; हा हात मुद्दां ठणठणतो पहा. (प्रकट) पण जाधवराव, तिच्यापेक्षां स्वरूपवान बायको दुनियेंत नाहीं सांपडायची. बादशहाशेजारीं तख्तावर बसून त्याला हुकूम करावा, अशी तिची योग्यता.

जाधव०—सर्दारसाहेब, आतां हा आपला रस्ता नव्हे.

झुंजार०—तिचा द्वेष करणारच; पण तिची वास्तविक योग्यता तुम्हां सांगितली. कशिदा काढण्यांत किती

कुशल! केवढें किती मंजुळ! गायला लागली म्हणजे जंगली पशूंनीं सुद्धां आपला स्वभाव विसरावा खरं! नमन चातुर्य काय! कल्पनाशक्ति किती अचाट!

जाधव०—म्हणूनच तर सर्व बिघडलं.

झुंजार०—कबूल; पण स्वभाव किती भोळसर!

जाधव०—फारच भोळसर धनीसाहेब; फाजील भोळसर.

झुंजार०—तें खरं; पण जाधवराव, तिची दया येते हो, दया येते!

जाधव०—त्याच्या कुकर्माबद्दल जर आपण इतके हळहळतां, तर मग बदकर्म करण्याबद्दल त्यांना एकमनदन करून द्या म्हणजे झालं; हो, या गोष्टीची आपल्याला जर खंत नाहीं, तर दुसऱ्या कुणाला असणार?

झुंजार०—(आत्मगत) तिचे ठिकर्‍या ठिकर्‍या एवढे तुकडे उडवितों माझ्याशीं बेमानपणा!

जाधव०—हें फार वाईट केलं त्यांनीं.

झुंजार०—जाधवराव, थोडें जहर द्या आणून; म्हणजे आज रात्रीं बोलून सुद्धां नाहीं तिच्याशीं; कारण तिच्या सुंदर शरीराकडे पाहून, माझा निश्चय ढळेल कदाचित्. म्हणून म्हणतों वीष द्या आणून.

जाधव०—छे छे, धनीसाहेब वीष नाहीं उपयोगी; जो बिछाना त्यांनीं भ्रष्ट केला, त्याच्यावरच नरड दाबून प्राण घ्या.

झुंजार०—शाबास! शाबास! न्यायी तोड काढलीन, उत्तम!

जाधव०— आज; पिलाजीरावाची व्यवस्था माझ्याकडे लागली न. मल्हाररावांनीं आपल्याला खबर पोचविली.

झुंजार०—ठरला बेत. पण हे कोण येत आहेत?

जाधव०—(पाहून) हे आपले [illegible] दादासाहेब येतात; हो तेच, बरोबर बाईसाहेबही आहेत.

(धनाजीराव, दादासाहेब, कमळजा, वगैरे येतात.)

धनाजी०—(मसलत, झुंजारास पाहून) सरकारचा हा हुकूम (एक कागद त्याच्या हातात देतो. झुंजार कागद वाचू लागतो.)

कमळ०—बरं दादासाहेब, आणखी काय खबर?

धनाजी०—काहीं विशेष नाहीं; पिलाजीराव मुतालिक खुशाल?

जाधव०—आहेत. जीवंत आहेत.

धनाजी०—म्हणजे?

कमळ०—म्हणजे काय! आतांशीं त्यांच्यावर स्वारीची फार मर्जी झाली आहे; पण तुम्ही आतां आतां शकाळून जुळून नवदं.

झुंजार०—अगदीं मर्जी!

कमळ०—काय म्हटलं स्वारीनें?

झुंजार०—(वाचू लागतो) हुकुमाप्रमाणें करण्यास चुकूं नये, मग—

धनाजी०—तुला नाहीं बोलले, हुकूम वाचतोय ते. पिलाजीरावाला आणि यांना बेबनाव झाला आहे का?

कमळ०—किती पण! तो जर निघेल, तर त्रास होईल. कारण पिलाजीरावावर माझा फार लोभ आहे.

झुंजार०—भलता होतो आगाचा!

कमळ०—काय म्हटलं?

झुंजार० मोठी शहाणी!

कमळ०—(स्वगत) स्वारी रागावली आहे वाटतं.

धनाजी० तो हुकूम वाचून कदाचित् रागावले असतील; कारण मला वाटतं, पिलाजीरावांना इथं मख्ल·क्र नेमून त्यांना परत बोलाविलं आहे.

कमळ० नवल, हें ऐकून मला आनंद झाला!

झुंजार० आणि तूं इतकी हुरळलीस, हें पाहून मलाही आनंद झाला.

कमळ०—तें कां?

झुंजार० चल बेशरम! (तिला मारतो.)

कमळ० (रडत) हें काय पण हें? मीं काय केलं?

धनाजी० छे! अति झालं हें. हा प्रकार मीं प्रत्यक्ष पाहिला म्हणून तरी सांगितलं. तरी वेणीपुरांत कुणाला खरं वाटायचं नाहीं. तो पहा रडते बिचारी!

झुंजार०—अहो मानभावी रडणं हें. अवदसा! चल. निघ इथून.

कमळ० आपल्याला राग येत असेल, तर जातें बापडी. (जाऊं लागते.)

धनाजी० खरी आज्ञाधारक बायको! मेहरबानी करून परत बोलवा तिला.

झुंजार० (रागानें) अग ए!

कमळ०—(परत येऊन) काय आज्ञा आहे?

झुंजार०—(तिजकडे पाहून धनाजीस) ही आली, काय करणार हिचं?

धनाजी०—(आश्चर्यानें) कोण मी?

झुंजार० हो, तुम्हींच सांगितलंना परत बोलवायला? अहो, ती अशी शंभरदां परतेल, आणि शंभरदां जाईल; रडेल, पाहिजे तें करील. तुम्ही म्हणतां तशी आज्ञाधारक आहे ती; मोठी आज्ञाधारक! (तिला) चालूं द्या रडणं. (त्याला) या हुकुमासंबंधानं (तिला) खूप सोंग आणलं आहे रडायचं! (त्याला) मला परत बोलावलं आहे.— (तिला) चल जा. मग बोलावीन तेव्हां ये. (त्याला) सरकारचा हुकूम मला मान्य आहे. (तिला) निघ इथून! (मोठ्यानं) त्याप्रमाणं पिलाजीरावाला अधिकार देतो. तुमची भेट झाली. आनंद झाला.—सगळा चोरांचा बाजार आहे चाहांनी—! (जातो.)

धनाजी० आमच्या दरबारचे रणशूर, धैर्याचे सागर, निष्कलंक, सद्गुणांचे पुतळे, ते हेच का झुंजारराव?

जाधव० छे! फार फरक पडला आहे अलीकडे.

धनाजी० अक्कल तरी ठिकाणी आहे की नाहीं? मला वाटतं याचं डोकं बिघडलं असावं.

जाधव० हां, हें असं आहे; यापेक्षां जास्त कांहीं मी बोलत नाहीं. असात तसं नसेल, तर व्हावं, असा मी नवस करतों!

धनाजी० प्रत्यक्ष बायकोला मारणं म्हणजे काय?

जाधव० हें तर चांगलं नव्हेच. पण एवढ्यावरून भागलं म्हणजे मिळविली हाणायची!

धनाजी० हें असं नेहमीं चालतं का? कीं हुकूम वाचून नवीनच उद्भवलं?

जाधव० काय सांगूं! मला पुष्कळ ठाऊक आहे,

पण तें मीं सांगणं रास्त नव्हे. इतकं कशाला? तुम्हीच पहा आतां त्यांची नव्हा म्हणजे झालं!

धनाजी०—झुंजारराव असे निघतील, हें स्वप्नीं सुद्धां नव्हतं.

(जातात.)

## प्रवेश दुसरा—स्थळ खोली.

(झुंजारराव व सारजा येतात.)

झुंजार०—तुझ्या काहीं दृष्टीस पडलं नाहीं?

सारजा—दृष्टीस पडलं नाहीं इतकंच नव्हे, तर कधीं ऐकलं नाहीं, कधीं संशय सुद्धां नाहीं.

झुंजार०—पण तिला आणि शिलेदाराला एके ठिकाणीं पाहिलं आहेस तूं?

सारजा—हो, पुष्कळदां; पण त्यांत काय? त्या दोघांचं बोलणं मीं अगदीं स्वस्थपणानं ऐकलं आहे.

झुंजार०—त्यांच्या कधीं कानगोष्टी चालत नव्हत्या?

सारजा—कधीं नव्हत्या.

झुंजार०—तीं दोघं खेळतांना असतांना, त्यांनीं तुला कधीं बाहेर नाहीं पाठवलं?

सारजा—छे! मुळींच नाहीं.

झुंजार०—पंखा आणायला म्हणून? पाणी आणायला म्हणून? कशालाही नाहीं?

सारजा—कद्धीं नाहीं महाराज, खरंच नाहीं.

झुंजार०—(अभिमानानें) मोठं आश्चर्य आहे तर मग!

सारजा—त्यांचं पाऊल तिळभर दिसेल वांकडं

नाहीं, हें मी खात्रीनं सांगतें; खोटं झालं तर मान उतरून देईन. त्यांच्याविषयीं आपल्या मनांत भलताच संशय आला असेल, तर तो काढून टाका कसा. अगदीं अगदीं खोटा! कुणीं दुष्टानं आपले कान भरून टाकले असतील, त्या मेल्याचा देव सत्यानाश करील! आमच्या माई-साहेब जर मोठ्या पतिव्रता नव्हेत, तर या जगांत पतिव्रता तरी कोण मेल्या!

झुंजार०— (कांहीं वेळ विचार करून) बरें जा, तिला पाठवून दे इकडे. (ती जाते.) मागितलंन इतकं वचन आहे; पण तिनकं तरी कुठं स्पष्ट सांगितलंन. पक्की बस्ताद रांड! असल्या गोष्टींची म्हणजे मोहोरबंद पेटी! पाहिजे तितक्या शपथा वाहील, पण शब्द नाहीं फुटायचा बाहेर. पण माहित आहे मला.

(कमळजा व सारजा येतात.)

कमळ०— ([illegible]) भाग, कां बोलावलं होतं?

झुंजार०— ([illegible]) ये अशी इकडे.

कमळ०— (जवळ जाऊन) काय आज्ञा आहे?

झुंजार०— पाहूं तुझे डोळे, वर पहा अशी माझ्या तोंडाकडे.

कमळ०— (लाजून) ही काय बाई भलतीच कल्पना!

झुंजार०— असं कां, तुला एक काम सांगतों. आम्ही इथं आहों, बाहेर जाऊन दार बंद कर; कुणी आलं तर थांबव, नाहीं तर दुसरी कांहीं खूण कर. हें चोरकमत्र तुला शिकवायला नको म्हणा; सगळ्यांनाच आहे. चल, उभी कां? जा आपल्या कामाला.

(सारजा मागे वळून पहात पहात जाते.)

कमळ० —याचा अर्थ काय महाराज! या आपल्या बोलण्यावरून आपल्याच्या मनस्वी संताप आला आहेसं दिसत; पण काय ह्मणतां कोण जाणे.

झुंजार० —कां, कोण आहेस तूं?

कमळ० —मी आपली खरी खरी धर्मपत्नि आहें.

झुंजार० —(तिचें मनगट धरून) घे अशी शपथ: मी आपली खरी धर्मपत्नि आहे! घे शपथ अशी आणि पड नरकांत जाऊन.

कमळ० —आहें कीं नाहीं तें ईश्वराला ठाऊक.

झुंजार० —(तिचा हात सोडून) ईश्वराला पक्कं ठाऊक आहे, कीं तूं भ्रष्ट आहेस.

कमळ० —महाराज मी भ्रष्ट! कोणी मला भ्रष्ट केलं! कशी भ्रष्ट मी?

झुंजार० —(तिची मनमुद्रा पाहून, गहिंवरून, आलिंगनाची इच्छा धरून) आहा! लाडके! -पण जा, जा, जा, इथून!

कमळ० —देवा! कायरे संकटाचा दिवस उगवला हा! डोळ्यांतून पाणी कां काढतां महाराज? मी तर नाहींना कारण झालें? माझ्या बाबांनीं आपल्याला परत न्यायची खटपट केली असा कदाचित् आपल्या मनात संशय आला असेल; पण त्याला मी काय करूं? आपलं आणि त्यांचं बिघडलं, तेव्हांच ते मला अंतरले.

झुंजार० —देवाच्या मनांत मला दुःखांत कुजवून माझी कसोटी पहायचं आलं असतं, त्यानं माझी किर्ती-ही हाल अपेष्टा केली असती, मला अगदीं भिकेकंगाल करून टाकलं असतं, निराश करून जन्मभर कैदेंत कोंडला असता, तरी मी फारसा डगलों नसतों; पण लोकांनीं

एकसारखीं थोडं दासवाशीं म्हणून, परमेश्वरा, मला काय-मचा पतळा करून ठेवलास, हें मी कसं सहन करूं ! कदाचित् हेंही मोठ्या कष्टानं सहन केलं असतं; परंतु जिथं मीं माझा जिव सांठवून ठेवला, फक्त जिथं माझा प्राण सर्वस्वी लटकून राहिला, तेथून मला खेंचून काढावं! अगर तिथं दुसऱ्यानीं हवा तो गोंधळ घालून मीं तुमची रखवालदारी करावी, हें कसं सहन करूं? कस सहन होईल मला? असली सहनशीलता कशी धरूं?

कमळ० माझ्या आचरणाबद्दल तर आपल्याला संशय नसेलना?

शृंगार० तुझ्या आचरणाबद्दल संशय! भलतंच! तूं केवढी पतिव्रता! तारा मंडोदरी सुद्धां तुझ्यापुढं कांहीं नव्हत. यांसशां आल्या नसतीस तर बेहेतर होत.

कमळ० असं माझ्या हातून चुकून पातक तरी कोणतं घडलं?

शृंगार० कोणतं बरं? तुझी ही सुंदर गोरीपान मूर्त 'कमलीण' हा शिक्का मारण्याकरता घडविली वाटतं! पातक कोणतं बरं म्हणते! बेशरम! तुझ्या पातकांचा नुसता उच्चार करीन, तर जिव्हा जळून खाक होईल. (वर दाखवून) तें पहा, चंद्रानं सुद्धा डोळे झाकले, वारा पृथ्वीच्या पोटांत दडून बसला, आणि काय पातक घडलं म्हणते, रांड!

कमळ० देवा शपथ! आपण माझ्यावर हा तुमची आग पाखडतां बरं.

शृंगार०—काय? तूं व्यभिचार नाहीं केलास! नाहीं केलास?

कमल०—कोणाही पुरुषाचा स्पर्श होऊं न देतां, फक्त हें शरीर आपल्याला अर्पण केलं, हाच जर व्यभिचार असेल तर कोण जाणे, पण याशिवाय मीं कांहीं व्यभिचार केला नाहीं.

झुंजार०—खरं सांगतेस हें?

कमल०—खोटं सांगत असेन तर माझ्या सर्वांगाला किडे पडतील.

झुंजार०—असं असेल तर चूक आहे माझी, क्षमा कर; मी समजलों कीं झुंजाररावाशीं ज्या सोटीनं लग्न लावलं, तीच तूं. पण चुकलों माफ कर. (दाराशीं जाऊन) ए नरकाचं द्वार राखणारे, (सारजा येते.) झालं आमचं काम, दार लाव, आणि ही गोष्ट कुठें फोडूं नकोस. (जातो.)

सारजा—काय बाई! यांच्या मनांत काय भरलं आहे कोण जाणे! माईसाहेब, माईसाहेब, काय चाललं आहे?

कमल०—अशी आपली आहे मी.

सारजा—महाराजांना असं काय झालं आहे आज?

कमल०—कोणाला?

सारजा—महाराजांना.

कमल०—महाराज कोण?

सारजा—हें काय माईसाहेब! आपले महाराज.

कमल०—सारजाबाई, मला महाराजबिराज कुणी नाहीं; तुम्ही कांहीं विचारूं नका आतां. माझ्यानं भड रडवतसुद्धां नाहीं; जाधवरावांना इकडे मी बोलावतें म्हणून घेऊन या, जा.

जाधव०—पण असें म्हणायचें कारण काय ?

कमळ०—कोण जाणे. (रडत) एवढं मला पक्कं ठाऊक आहे, कीं मी काहीं तशी नाहीं.

जाधव०—छे ! छे ! रडूं नका माईसाहेब. (आपले डोळे पुशीत) काय प्रसंग हा !

सारजा—मोठमोठ्या सरदारांचे मुलगे टाकले, प्रत्यक्ष बापाची मर्जी मोडली, जानगोतावर पाणी सोडलें, तें कमनशीब म्हणून घेण्याकरतां का ? कुणाला नाहीं रडूं यायचं अशानं ?

कमळ०—हे सारे माझ्या फुटक्या नशिबाचे खेळ आहेत.

जाधव० काय हा त्यांचा वेडेपणा ! पण हें कोठून शिरलं त्यांच्या डोक्यांत ?

कमळ० —(डोळ्यांत पाणी आणून) ईश्वराला ठाऊक !

सारजा—कुणीतरी असेल चांडाळ, हांजीहांजीखोर, दगलबाज, मात्रागमनी, लुच्चा असेल, त्यानं आपल्याला एखादी जागा मिळावी म्हणून हें कुभांड रचलं आहे, असतीं त्याचीं नावें: खोटं झालं तर मान कापून देईन.

जाधव०—(न राहवून) चल ! भलतंच बोलते काहीं तरी ! इतका हरामखोर आहे कोण इथं ?

कमळ०—असल्याच कुणीतरी नर देवा, क्षमा कर त्याच्यावर.

सारजा—(संतापानें) क्षमा काय म्हणून ? गळफांस घालावा, आणि मेल्याच्या अस्थि नरकांत फेकून द्याव्या !

त्यांनीं काय म्हणून यांना कसबीण म्हणावं? कुणाशीं? कुठें? केव्हां? कसं? कशावरून? कुणीतरी हलकट सोद्या मांगानं ही गोष्ट महाराजांच्या मनांत भरवून दिली आहे. देवानं असं करावं हवं तर, कीं त्या चेरडाला जगापुढें ओढावा, नागवा उघडा करावा, एकेक भल्यामाणसाच्या हातांत एकेक मऊ भक्कम असुड देऊन, त्या चांडाळाची साऱ्या दुनियेभर चामडी लोळवीत धिंड काढावी.

**जाधव०**—(रागानें पण हळू आवाजानें) अग, हळू बोल ऐकतील कुणी.

**सारजा**—(जास्त जोरानें) मला काय त्याचं भय! असल्या लुच्चांपैकींच एकानं, महाराजांनं आणि माझं सूत आहे, असं सांगून आपले नव्हेत का कान फुंकून दिले?

**जाधव०**—(रागानें) तूं आहेस गधडी! गप्प रहा आतां.

**कमळ०**—जाधवराव, हें त्यांच्या मनांतलं जाऊन पुन्हा माझ्यावर मर्जी बसायला मी काय बरं उपाय करूं? तुम्ही तरी जाऊन दोन गोष्टी सांगा. जगदंबेची शपथ घेऊन सांगतें, कीं कधीं माझं मन दुसरीकडे धांवलं असेल, कधीं पापबुद्धीनं मी भलत्याकडे पाहिलं असेल, कुणाचं बोलणं ऐकलं असेल, किंवा आजपर्यंत तर नाहींच, पण पुढें त्यांनीं मला सोडून दिलं, माझे हाल वनवास झाले, तरी सुद्धां जर माझं प्रेम तिळभर ढळलं, तर माझे जन्मभर हालहाल होतील! त्यांच्या गैरमर्जीनं माझं सगळं जिणं निष्फळ झालं, तरी माझ्या मनांतल्या निर्मळ प्रीतीला कधीं डाग लागायचा नाहीं. कसबीण! अगबाई! हें

पहा —तो शब्द सुद्धां ह्मणवत नाहीं, तुमच्या शब्दानें जर इतकी खंती येते, तर दुनियेची दौलत मिळाली तरी, तें नात मिळवायचें कसब माझ्या हातून कसं होईल बरं ?

जाधव॰ आपण स्वस्थ असा माईसाहेब, ही त्याची लहर कांहीं फार दिवस टिकायची नाहीं. कांहीं दरबारी कामावरून तडतड खवळून तो राग आपल्यावर काढला आहेसं दिसतं.

कमळ॰ —दुसरं कांहीं नसेल तर (हुदके देते)

जाधव॰ —हेंच; मी खात्रीनं सांगतों. आतां रडूं नका. लवकरच सर्व ठीक होईल. ही पहा. दादासाहेब वगैरे मंडळी आली; जेवायला चला आतां. कांहीं काळजी करूं नका.

( कमळजा व सारजा जातात; रंभाजीराव येतात )

जाधव॰ या रंभाजीराव, काहीं जास्तकमी ?

रंभाजी॰ —(रागानं) बस्स ! तुम्हीं आमच्याशीं नेकीनं वागत नाहीं असं दिसतं.

जाधव॰ — (किंचित हसत) तर कसा वागतों.

रंभाजी॰ —दररोज कांहीं तरी नवी हिकमत काढून आमची तुम्हीं टोलवाटोलवीच चालविली आहे; यावरून असं धोरण दिसतं, की तुमच्यापासून काम होण्याची तर आशा लांबच, पण उलट आम्हाला गोत्यांत मात्र घालतां आहां. खरं सांगतों—याउप्पर कांहीं आपल्याला हें सहायचं नाहीं; तसच आजपर्यंत आमच्याच मूर्खपणानं आम्हाला जो चट्टा बसला, त्याबद्दल तोंड बांधून स्वस्थ बसाव, असंही वाटत नाहीं.

जाधव० पण माझं म्हणणं तर ऐका.

रंभाजी० नको. पुष्कळ ऐकलं, इतकं ऐकून राहून; कारण तुम्ही बोलतां एक आणि करतां एक.

जाधव० हा तुम्ही माझ्यावर निव्वळ खोटा दोष ठेवता बरं.

रंभाजी० — बिलकूल खोटा नाही. मी बरोबर आज-लेल्या सर्व पैसा उचलून बसलों. कमळेला देण्याकरतां तुम्ही जे जडजवाहीर माझ्यापासून नेलेंत, तेवढ्यानं एखादी महापर्वतासुद्धां अर्धी अधिक वजनी असती. तुम्ही सांगितलंत, की तिनं तें जवाहीर मोठ्या खुषीनं घेतलं; आणि 'लवकरच मद बैठकीचा योग घडून आनंदी-आनंद होईल,' असा तिचा उलट निरोप मला पाठविलात, पण त्यांतलं काहीच नाहीं अजून!

जाधव० (हसत) चालू द्या. ठीक चाललं आहे; उत्तम!

रंभाजी० (वेडावून) चालू द्या! ठीक चाललं आहे! चालू द्या म्हणण्यानं मी मनुष्य नव्हे; ठीक चाललं आहे, उत्तम! हें बोलणं आमच्यापाशीं नाहीं चालायचं, समजलां? माझी खात्री झाली आहे. की ही तुमची दगलबाजी आहे, आणि यांत तुम्ही मला सफाई बुडविलंत.

जाधव० (मान डोलवीत व हसत) फार उत्तम!

रंभाजी० तुम्हांला बजावून सांगतो, हें काम फार उत्तमांतलं नाहीं; मी समक्ष जाऊन तिची गांठ घेईन; तिनं माझं जवाहीर परत दिलं तर बरंच आहे. तिचा नाद सोडून, तिच्यावर वांकडी नजर ठेवल्याबद्दल कान पिळून घेईन. पण तिनं जर तें परत दिलं नाहीं, तर राजश्री, याद राखा, मी तुमच्यापासून भरून घेईन.

कमळ० तुम्हाला हें सगळं जग दिलं, तर तुम्ही कराल का असं ?

सारजा — हो-करूनसवरून मागमूस सुद्धां लागूं द्यायचा नाहीं. असं पहा, आपल्या नवऱ्याला जगाचं राज्य मिळत तर कां नाहीं करूं !

कमळ० —(गहिंवरून) नकोग बाई तें जग ! आणि मेलं असं करणं ! मला नाहीं वाटत अशी कुणी बायको असेल.

सारजा —अशा एक का दोन-लाखोगणती आहेत माईसाहेब, पण मी सांगते बायकांचं वांकडं पाऊल पडायला त्यांचे नवरेच कारण. आपण पाहिजे तसे ढंग करतात, हवे तसे नाचतात, आणि कांहीं तरी संशय घेऊन आम्हाला मात्र कोंडून ठेवतात; जरा कांहीं झालं की द्या शिव्या. कांहीं चुकलं की द्या मार, तोडा अन्न, ठेवा कोंडून पण हें असं काय म्हणून ? आम्ही बिचाऱ्या गरीब गाई म्हणून वाटतं ? पण त्यांना हें कसं नाहीं समजत, की आपल्या प्रमाणेच बायकांनाही कांहीं अक्कल आहे, त्यानाही पहाता येतं, कडू गोड समजतं, त्याच्याप्रमाणे आम्हालाही विकार होतात, आम्हालाही त्यांच्यासारखे रंग करावासे वाटतो. तात्पर्य. त्यांचा जसा आमचाही पाय घसरतो. हें का जर नाहीं ध्यानात येत तर ! अहो ' जितं तसं वळण ' म्हण आहे अशी.

कमळ० चला सारजाबाई आता. आई भवानीबाई, बाई पाहून वाईट करायची मला बुद्धि देऊ नकोस, चांगलं करायची दे. (जातात.)

अंक चवथा समाप्त.

---

# अंक ५ वा.

## प्रवेश पहिला—रस्ता.

( जाधवराव व रंभाजीराव येतात. )

**जाधव०**—( जागा दाखवून ) हं, असे इथं आड उभे रहा. या रस्त्यानं समोर येईल तो. तरवार उपसून अगदीं तयार असा; आल्या अवसानांत कीं द्या खुपसून. अगदीं भिऊं नका–मी हा जवळ आहें तुमच्या. यांत आपला सोक्ष किंवा मोक्ष हें ध्यानांत ठेवून मनाचा पक्का निर्धार करा, समजलें? ( जाऊं लागतो. )

**रंभाजी०**—( त्याला धरून ) पण तुम्ही अगदीं जवळ असा हं, कदाचित् माझा हात चुकेलबिकेल म्हणून म्हणतों.

**जाधव०**—अहो, हा मी, इथं उभा राहतों; इतका काय असे? ( पाठ वळवून, तरवार सरसावून चांगले पवित्र्यावर उभे रहा.

( दूर जाऊन पिलाजीरावाच्या रस्त्याकडे पहातो. )

**रंभाजी०**—( आपल्याशी ) आपल्या कामाची सद्; सोईशी होस आहे असे नाहीं, पण आनंदरावानं याबद्दल माझ्या मनाची खात्री करून दिली आहे, म्हणून तयार आलों. यांत फक्त एक मनुष्य येईल, उलकेने! ( चलाख कंप ) चल निघ, मत्तेस काय? ( तरवार उपसून ) हा आतां काय, तिंत एक आणि तुकडे दोन! जाते कुठं लंका!

**जाधव०**—( रंभाजीची कृति पाहून ) या पुढच्या स्वारी चोळवटून ठेवली आहे स्वारीच्या अंतःकरणाही नखचाच चढल्यासारखा दिसतो. आतां हा त्याला ठार करील. किंवा

किती कळकळ तुला! या कामांत तूं माझा गुरु आहेस. (थायकोम उद्देशून) छबेल्ले! तुझा यार तर ठार झालाच, आणि तुझाही घडा भरत आला- हा आलोंच बघ. तुझ्या नेत्रांचा आणि लावण्याचा माझ्या मनावर मोह पडला होता, तो पार नाहींसा झाला. तूं थाटवलेल्या बिछान्यावर तुझ्या रक्ताचाच सडा घालतों पहा आतां! (जातो.)

(धनाजीराव व मुधोजीराव दुरून येतात.)

पिलाजी०--रस्तवाला, गांवकरी, कुणी नाहीं काहो?

मुधोजी० हा कुणी मोठ्यान ओरडतो कांहीं दगा आहे.

पिलाजी० अहो कुणी तरी या हो.

रंभाजी०- काय दुष्ट चांडाळ मी!

धनाजी०—दोन तीन असामी कण्हतात; हीं काळोखी रात्र, कदाचित् दगलबाजी असेल; तेव्हां जास्त कुमक आल्याशिवाय पुढं सरसावणं बिनधोक नाहीं.

रंभाजी० -नाहीं काहो येत कुणी? तर मी असाच मरणार—

धनाजी० ऐका

मुधोजी० एका हातांत कंदील, एका हातांत तर वार घेऊन हा कोण येतो आहे पहा. (जालवराव येतो)

जालव० कोणहो खून खून म्हणून कोण ओरडतो?

पिलाजी - अहो मी हो! मेहेरबानी करून इकडे या.

**जाधव॰** —काय झालें हो ?

**मुधोजी॰** हा शृंगारराबाचा निशाणवाला जाधवराव वाटतें ?

**धनाजी॰** --तोच जबर छातीचा मनुष्य आहे.

**जाधव॰**—(पिलाजीरावाजवळ जाऊन) कोण हो तुम्ही ? असे कां ओरडतां ?

**पिलाजी॰** —कोण जाधवराव ? पहा कुणीं दरोडेखोरांनीं माझी काय दशा केली ही.

**जाधव॰** (पाय पाहून) अरे ! अरे ! अरे ! मुनाफिकसाहेब ! कुणाचें काम हें ?

**पिलाजी॰** त्यांच्यापैकीं एक जमिनदोस्त होऊन इथेंच कुठें आसपास पडला आहे, पहा.

**जाधव॰** अरे बेरडांनो ! (धनाजीराव व मुधोजीराव यांना ) तुम्ही कोण हो तिकडे ? जरा मदतीला या.

**रंभाजी॰** माझ्याकडे याहो कुणी !

**पिलाजी॰** तोच–तोच–पहा जाधवराव !

**जाधव॰** अरे बेरडा ! हरामखोरा, (जवळ जाऊन त्याच्या पोटांत तरवार खुपसतो. तो 'अरे बापाला जाधवराबा,' असें ओरडतो, त्याच वेळीं मोठ्यानें ) असे काळोख्यांत माणसांचे प्राण घेतां काय ? कुठें आहेत ते हरामखोर ? शहरांत काय तिकडे तिकडे सामसूम आहे. अहो खून ! खून ! —तुम्ही कोण हो ? चोर कीं साव ?

**धनाजी॰**—तुम्ही ठरवाल ते.

**जाधव॰**—( चपापलेंसे करून ) कोण दादासाहेब ! ओ-

ळल नाहीं ! माफी असावी. कुणी चोरट्यांनीं आमच्या पिलाजीरावाला जखमी करून पाडलं आहे पहा.

मुधोजी० पिलाजीरावांना ? अरे ! अरे ! ( सर्व ज-वळ जातात. )

जाधव० ( कंदील दाखवून ) मुतालिकसाहेब, कसं आहे आतां ?

पिलाजी० पाय गेला हो गेला ! दोन तुकडे झाले.

जाधव० भिऊं नका अहो कंदील करा पुढें -आधीं बांधून टाकतों माझ्या पटक्यानं. ( चंपाजी येतो. )

चंपाजी ( पाय या घ्याच्या ) कोण ? कोण ओरडलं हो आतां ?

जाधव० कोण ओरडलं ?

चंपाजी—( पिलाजीरावास जखमी पाहून ) अरे देवा ! काय झालं हो ?

जाधव० -काय खटपटी गड आहे ! बरं पिलाजी-राव, या कामांत तुमचा कुणावर वहीम आहे का ?

पिलाजी० –छे, कुणावर नाहीं.

जाधव०—अहो एक काचा, पटका, कांहीं तरी द्या पाहूं. ( पटक्यानें पाय बांधून ) हा - असं—याना इथून नीट घेऊन जायला एखादी डोली आणा बरं.

चंपाजी अरे देवा ! निजनिज पडले ! पिलाजीराव ! पिलाजीराव !

जाधव०—या कृत्यांत या रांडेचं आंग असावं, असा संशय येतो.–जरा थांबा पिलाजीराव पण इकडे कंदील दाखवा बरं; हा चेहरा ओळखीचा आहे कीं नाहीं

पाहूं (रंभाजीचें प्रेत पाहून चिंता करून) अरे! अरे! अरे! अरे पेर्णापूरचे माझे दोस्त. रंभाजीराव! हे, नव्हेत, नव्हेत काय तेच.

पुंभोजी० — कोठले! पेर्णापूरचे?

जाधव० — होय हो. आपल्या होते का ओळखीचे?

पुंभोजी० तर हो.

जाधव० (सुभेदारांस) या धांदलींत मीं आपल्याला ओळखलं नाहीं. माफ करा. दोन्ही आल्या का – आल्या, बरं झालं. (रामसिंगाला व दुसऱ्याला पाहून) यांना आता उचलून घेऊन चला. मी जखमा बांधणाराला घेऊन येतों. (सारजेस) तूं जा आतां. कायहो पिलाजीराव, तो मेलेला माझा दोस्त होता, त्याचं आणि तुमचं काहीं वांकडं होतं का?

पिलाजी० छे! मला त्याची ओळख सुद्धां नाहीं.

जाधव० (सारजेस) कां गडे, तुझा चेहरा कां उतरला. नीट सभाळून घेऊन चला. (या दोघांस नेतात) (सारजेस) तुम्ही थांबा जरा. काय? तूं कां अशी किती पडलीस? तुम्हाला नाहीं हिनी दृष्टि घातलेली दिसत? नीट पहा, म्हणजे यांतच आपल्याला पुष्कळ कळेल. बारीक नजरेनं पहा दिसतं का काहीं चेहऱ्यावर? दिसलंच पाहिजे. जीभ चावून ठेवली म्हणून पाप कसं झांकेल?

सारजा (घाबरून येऊन) काय काय झालं?

जाधव० —(इशारा मुद्रा करून) आमच्या पिलाजीरावांना रंभाजीनं, आणखी दुसऱ्या काहीं इसमानीं काळोखांत गांठला. ते बाकीचे निसटले, पण पिलाजीराव फार जखमी झाले आहेत. आणि रंभाजी तर मेलाच ठार.

( मंचक कडे न्याहाळून पहातो ) पण पिलाजीराव रात्रीं कोठें होते बरें? ( चंपाजीस ) हें ऐकून तूं का थरथर कांपायला लागलीस?

चंपाजी — ते माझ्या घरीं होते; पण त्यामुळें नाहीं मी कांपत.

जगजीत० — बरं बरं! ( मङ्गीस ) चला, पिलाजीरावांच्या जखमा बांधल्या की नाहीं. चंपाजी चला आमच्या बरोबर. कशी नाहीं खरी हकीगत सांगत तें पाहतों. ( चाकरास ) तूं असाच जाऊन धनीसाहेबांना आणि माईसाहेबांना, ही सगळी बातमी कळीव; जा लवकर. ( तो गेल्यावर आपल्याशीं ) आज रात्रीं आपण एक चढणार, किंवा सपशेल पडणार. ( सर्व जातात. )

## प्रवेश दुसरा.

( **कमळजा** निजली आहे व जवळ एक दिवा जळत आहे. )

झुंजार० ( गंभीर स्वरानें ) मला, तेंच, तेंच कारण! परमेश्वरा, या तोंडानें मी त्याचा उच्चार करूं नये, पण कारण तेंच! ( पुढें येऊन, तिच्याकडे पाहून एकदम तरवार उपसून ) छे छे! या कोमल गौरवर्ण शरीरावर ही कठोर तरवार चालवून रक्तपात करणें माझ्या हातून होत नाहीं. ( तरवार म्यानांत घालतो. ) परंतु प्राण हा घेतलाच पाहिजे. नाहीं तर ही आणखी कित्येकांना असाच दगा देऊन घात करील. ( आवेशानें तिच्याकडे जातो, पण उशाशीं दिवा पाहून थबकतो ) पण अगोदर दिवा मालवावा. आणि मग ( तिच्याकडे बोट करून ) हा दिवा मालवावा. तो दिवा मालविला तर वाटेल तेव्हां पुन्हा लावतां येईल; पण लाडके, तुझ्या या अद्वितीय लावण्यमूर्तीतला प्राणदिवा एकदां जर मी मालि-

वत्सा, तर तो पुन्हा लावतां येईल अशी मंत्रशक्ति माझ्या अंगीं कुठं आहे? हें नाजूक गुलाबाचं फूल जर मीं एकदां खुडलं तर अर्थात् कोमेजूनच गेलं पाहिजे. असो, झाडावर आहे तोंपर्यंत तरी आस्वाद घ्यावा. (चुंबन घेऊन) अहाहा! श्वासाला काय घमघमाट हा! या योगानं प्रत्यक्ष न्यायाला सुद्धां आपलं शस्त्र मोडून टाकावं अशी वासना होईल. आणखी एकदां आणखी एकदां (दोनदां चुंबन घेऊन) लाडके, मी तुला मारतों, पण मेल्यावर तूं अशी न रहा, म्हणजे मी तुझ्यावर पहिल्यासारखी प्रीति करीन. आणखी एकदां पण हें मात्र शेवटचं. इतकी मोहक असून अशी घातक वस्तु कधींच झाली नाहीं! हे अश्रु नाहूं लागले, पण मोठे दुष्ट आहेत; जिच्यावर प्रेम तिलाच मारायचं अं! काय अलौकिक दुःख हें. (तिची हालचाल पाहून) जागी झाली वाटतं.

कमळ० (दचकून जागी होऊन) कोण तें? (नीट पाहून) आपण का? (उठून) निजायचं ना आतां?

झुंजार० (तोंड फिरवून) आज निजतांना जगदंबेचं स्मरण केलं होतंस?

कमळ० होय, केलं होतं.

झुंजार० (थांबून) तर, एखाद्या पातकाबद्दल परमेश्वराची क्षमा मागितली नसलीस, तर आतां मागून घे.

कमळ० (घाबरून) म्हणजे काय महाराज?

झुंजार० चल आटप लवकर; मरणाची तयारी कर.

कमळ०— (भयानें) आपण मला मारणार कीं काय?

झुंजार० होहो, मारणार.

कमळ०—तर जगदंबे, घे मला पदरांत!

कमळ०—पाहिजे त्याची शपत घेऊन सांगतें, कीं मीं कांहीं दिला नाहीं, त्यालाच आणवून विचारा, हवं तर.

झुंजार० (जोराने तिचा हात धरून) संभाळ, खोटं बोलूं नकोस, मृत्यूच्या जबड्यांत सांपडली आहेस; आतां तरी खोटं बोलूं नकोस.

कमळ०—पण मला पक्कं ठाऊक आहे कीं, आपण कांहीं मला असं एकाएकीं मारणार नाहीं.

झुंजार० नाहीं आत्तां या क्षणीं मी तुझा प्राण घेणार. म्हणून सांगतों, काय पाप केलं असशील तें जगदंबेपाशीं सर्व कबूल कर. कारण माझी तर खात्रीलायक खात्री झाली आहे; आतां तूं किती आणा शपथा वाहिल्यास, तरी माझा ग्रह कांहीं पालटायचा नाहीं.

कमळ० अंबाबाई! आतां तुलाच माझी करुणा येऊं दे! आणि महाराज, आपल्याला देखील आली पाहिजे; कारण आजपर्यंत आपल्या मर्जीबाहेर मी कधीं वागलें नाहीं; धर्माची मर्यादा उल्लंघन करून मीं पिलाजीरावावर कधीं लोभ केला नाहीं, किंवा त्याला प्रेमाची खूणही दिली नाहीं.

झुंजार० पुन्हा खोटं बोलतेस वरं! माझा रुमाल त्याच्या हातांत मीं या डोळ्यांनीं पाहिला.

कमळ० (घाबरून) तर मग तो त्याला सांपडला असेल; मीं कांहीं दिला नाहीं. त्यालाच बोलावून विचारा काय सांगतो तें.

झुंजार० —(रागावून) सांगितलंन त्यानं.

कमळ० काय सांगितलंन?

**झुंजार०**—तुझ्याशीं व्यभिचार केला म्हणून.

**कमळ०**—(कानावर हात ठेवून) शिव शिव! तो असं कधीं सांगायचा नाहीं.

**झुंजार०**—आतां कशाला सांगेल! तोंडच बंद झालं त्याचं; माझ्या जाधवरावानं तेवढी कामगिरी छान बजावली.

**कमळ०**—अगबाई! तरी मला वाटलंच; तो मेला कीं काय!

**झुंजार०**—त्याच्या केसागणिक जरी पिल्लाजी असते, तरी त्या सर्वांचा मीं माझ्या क्रोधानं स्वाहा केला असता.

**कमळ०**—(रडत) देवा रे देवा! त्याच्या करतानं मारून माझा सर्वस्वीं घात केला.

**झुंजार०**—(डोळ्यांत पुढें ओढून) धडधडीत माझ्यासमक्ष त्याच्याकरतां रडतेस!

**कमळ०**—(त्याच्या पायां पडून) महाराज, मला घरांतून घालवून द्या, पण मारू नका.

**झुंजार०**—तें कांहीं नाहीं आतां.

**कमळ०**—आज तरी नको, उद्यां मारा—

**झुंजार०**—नाहीं; आत्तां मारणार! जर अशी धडपडलीस—

**कमळ०**—(रडत) एक घटका तरी—(वर हात जोडून) एकदां स्मरण तरी करूं महाराज—

**झुंजार०**—बस्स! वेळ नाहीं आतां—(तिला बिछान्यावर पाडून जोरानें तिचा गळा दाबतो; इतक्यांत बाहेर दरवाजावर कोणी हात मारल्याचा आवाज होतो.)

**सारजा**—(बाहेरून) धनीसाहेब! अहो धनीसाहेब! धनीसाहेब!

झुंजार०—कोण ओरडतं? (कमळजेकडे पाहून) अजून नाहीं मेली? पुरी नाहीं मेली अजून! कितीही कठोर असलों, तरी मला दया आहे; मी तुला मरतांना यातना होऊं द्यायचा नाहीं तर, (तोंड फिरवून पुन्हा जोराने दाबतो) हां—असं—

सारजा—(दार वाजवीत) धनीसाहेब! अहो धनीसाहेब!

झुंजार०—(घोटाळ्याने) कोण आहे तें?

सारजा—आपल्याला कांहीं खबर कळवायची आहे, गांठ पाहिजे.

झुंजार०—(तिला) आलों (आपल्याशीं) ही सारजा आली. (तिला) थांब जरा. (कमळजेकडे पाहून आपल्याशीं) ही मेली आतां. ती बहुतकरून पिलाजीराव मेला म्हणून सांगायला आली असेल; मोठाच दंगा उडाला होता. हालचाल बंद होऊन अगदीं प्रेतासारखी पडली. तिला शांत घ्यावी का? जीव आहे वाटतं? छे! शांत घ्यावी! का न घ्यावी? ती आत आली तर माझ्या बायकोशीं बोलल्यावांचून राहायची नाहीं. (दुःखानें) माझी बायको! आता कुठली बायको! गेली! केवढं घोर साहस कर्म केलं हें? मला वाटतं, या प्रसंगीं चंद्रसूर्यांना पूर्ण ग्रास होऊन पतन पृथ्वीसुद्धां दुभंगून गेली असेल!

सारजा—(मोठ्याने) अहो धनीसाहेब!

झुंजार०—(दचकून) मी तुला विसरलोंच, आलों हं—(दाराकडे जात जात खुंटीवर दृष्टि लागतो, पण आपलें नशीब समजून काहीं वेळ थांबून उभा राहून नंतर दार उघडतो.) ये काय खबर आणलीस?

झुंजार०— पण हें स्वतानेंच कृत्य असें ती म्हणाली; माझं नव्हे.

सारजा— त्या असं म्हणाल्या खरं; खोटं कस बोलूं.

झुंजार०—हें पहा मरतांना सुद्धां खोटं बोलून नरकांत पडायला गेली. मी—मीं तिचा खून केला.

सारजा— तर मग त्या खऱ्या पतिव्रता, आणि तुम्ही मात्र अधम चांडाळ ठरलात.

झुंजार०— तिला पतिव्रता म्हणतेस! अग, जारिणी होती ती जारिणी.

सारजा— अरे राक्षसा! त्यांना जारिणी म्हणतेस! किडे पडतील तोंडाला.

झुंजार०—नुसती कसबीण नव्हे तिच्याहीपलीकडची होती.

सारजा— अरे मांगा! हें तूं त्या साध्वीवर खोटं कुभांड रचलं आहेस!

झुंजार०—पक्क्या आधारावांचून मीं हें कृत्य केलं असेल तर रौरव नरकांत जाऊन पडेन! शिवाजीरावाशीं ही लागू होती, समजलीस! तुझ्या नवऱ्याला हें सर्व ठाऊक आहे.

सारजा— त्यांना ठाऊक आहे?

झुंजार०— हो, हो.

सारजा— कीं बाईसाहेब वाईट चालीच्या होत्या म्हणून?

झुंजार०— हो, शिवाजीरावाशीं संबंध होता म्हणून; अग, ती जर तशी पतिव्रता असती, तर ईश्वरानं मला दुसरं इंद्रभवन दिलं असतं, तरी मी तिला मारली नसती.

**सारजा**—कुणाला ठाऊक आहे म्हटलंत?

**झुंजार०** तुझ्या नवऱ्याला, त्यानंच मला प्रथम सांगितलं हें. तो मोठा सच्चा मनुष्य आहे, आणि त्याला असल्या बदमाषगिरीची मोठी चीड आहे.

**सारजा** त्या अशाअशा आहेत म्हणून त्यांनीं सांगितलं म्हणता?

**झुंजार०** (चिडून) असं वरचेवर काय विचारतेस? तुझ्या तुझ्या—नवऱ्यानं माझ्या जिवलग दोस्तानं जानव-रावानं सांगितलं; कळलं आता?

**सारजा** तर मग माईसाहेब, कुणीं चांडाळानं खऱ्या प्रेमानं मातेरं मातेर करून सोडलं! त्यांनीं असं सांगितलं असेल, तर त्यांची जीभ झडून पडो! अगदीं अगदीं खोटं सांगितलं हें. पण तुझ्यासारख्या काळ्या खविसावर त्या आधीं इतक्या कशा भाळल्या होत्या कोण जाणे!

**झुंजार०** (तरवारीला हात घालून) हां खबरदार!

**सारजा** हटानं नकोस असं पुन्हां म्हणतें, माईसाहेब कशा नक्षत्रासारख्या शोभत होत्या आणि तू मेल्या, त्यांच्यापुढें राक्षससा दिसत होतास. तुझ्यासारख्याचंच तुझं हें कृत्य—

**झुंजार०** सभाळ! जड जाईल!

**सारजा** जड काय जायचं आहे! काय करशील! किती हाल करशील माझे? करशील त्याच्या दुप्पट सोसायला तयार आहे. अरे दगडा! नंदीबैला! कार्टीची शुद्ध तुला अक्कल नाहीं रे! इतकं अघोर कृत्य केलंस तुझ्या तरवारीला नाहीं भीत आतां शंभरदा मरेन हवी तर. पण

तुझ्या नांवाचा डांगोरा पिटल्याशिवाय रहायची नाहीं. (माडगांवें बघून) धांव हो धावा! धावा! धावा! या झुंजाऱ्यानें आपल्या बायकोचा खून केला—धावा हो धावा!

(परसोजी, मुधोजीराव व जाधवराव धांवत येतात)

परसोजी व मुधोजी०—(गडबडीनें) काय, काय झालें हो? (खूनगाऱ्यास पाहून) सरलष्करसाहेब!

सारजा—(जाधवरावास) आपण आलां का? दुसऱ्यांनीं खून करून ते तुमच्या शिरावर चालवीत, फार चांगलं केलंत! खरे पुरुष असाल, तर यांच खोटं याच्या पदरांत घाला पाहूं हा म्हणतो, माझी बायको जारिणी आहे, असं तुम्हीं सांगितलंत; तुम्ही असल्या सांगण्या करायचे नाहीं, माझी खात्री आहे;—बोला बोला लवकर, सांगितलं का?

जाधव०—मला जें वाटलं तें सांगितलं, आणि तें त्यांच्या अनुभवासही आलं.

सारजा—पण यांची बायको नष्ट आहे म्हणून कधीं सांगितलं होतंत का?

जाधव०—हो, सांगितलं होतं.

सारजा—मग हें तुम्ही खोटं बोलला; अगदीं खोटं बोललां; शपथ घालतें, अगदीं अगदीं खोटं बोलला; निव्वळ अधमपणा केलात. पिराजीरावाशीं लग्न होईना असं सांगितलं होतंत का?

जाधव०—(रागानें) हो, हो, पिराजीरावाशीं—असं सांगितलं होतं. जीभ आटप आतां.

सारजा—आतां कसली जीभ आटपते! बोललंस

पाहिजे; माईसाहेबांना खून होऊन हें पहा प्रेत पडलें आहे.

**परसोजी व मुधोजी०**—( पाहून ) शिव शिव! काय अनर्थ हा!

**सारजा**—आणि ( जाधवरावास ) तुम्हीं आग लावली ह्मणून खून पडला हा.

**झुंजार०** हिचें ह्मणणं खरं आहे.

**परसोजी व मुधोजी०** काय विलक्षण! केवढें अघोर कृत्य हें!

**सारजा** हीं कमावाची करणी केली हो! माझ्या आता सगळ ध्यानांत आलं. मी कांहीं आता यातून जगत नाहीं; मांगपणा हा! पुरा मांगपणारे देवा!

**जाधव०** ( दटावून ) काय तुला वेड लागलं आहे कीं काय? चल जा घरीं.

**सारजा**—याची आज्ञा मोडूं नये खरी; पण त्याची ही वेळ नव्हे. आतां कशाची घरीं जातें, इथेंच माझं मरण.

**झुंजार०** –( बिछान्यावर बसून ) अरे! अरे! अरे!

**सारजा**—आतां तुमचं 'अरे अरे' करून काय होतं? यां अशा महा सात्वीचा विनाकारण प्राण घेतलाय! मो-ठ्यानं गळा काढून मोठ्या रडत बैस आता!

**झुंजार०**—( उठून ) अग, ती सात्वी नव्हती, जारिणी होती. ( मुधोजीस पाहून ) कोण? काकासाहेब! तुम्ही काय? ही पहा तुमची पुतणी पडली आहे; आतां या हातांनीं तिचा गळा दाबून प्राण घेतला. कृत्य भयंकर हें मी ओळखून आहें.

आहे; पण तुम्ही सांगा, तुम्हीं दोघांनीं मिळून पिलाजी-रावला मारायची मसलत केली होती का?

झुंजार० होय, केली होती.

पिलाजी० (नम्रपणानें) पण धनीसाहेब, असा माझ्या हातून कांहीं गुन्हा झाला नव्हता.

झुंजार० झाला नव्हता खरा; त्याबद्दल माफी मागतों; पण (नरवराकडे बोट दाखवून) या सैतानाला असं विचारा, कीं त्यानं माझ्याकडून असं अघोर पातक कां करविलं.

जाधव० (निग्रहानें) मला कांहीं विचारूं नका. तुम्हाला कळलं तेवढं कळलं; याउप्पर मी एक शब्दसुद्धां काढणार नाहीं.

धनाजी०—देवाचं सुद्धां नांव घ्यायचा नाहींस!

सुभानजी० चांगला लवा केल्यावर शकून घेशील! बेरडा!

झुंजार० येऊं नयेस हेंच उत्तम; पण कां हो पिला-जीराव, माझ्या बायकोचा हातरुमाल तुमच्याजवळ कसा आला?

पिलाजी०— तो, धनीसाहेब, माझ्या खोलींत मला सांपडला; कांहीं मतलबानं मीच तिथं नेऊन टाकला, असं यानं स्वतः आतां तुरुंगांत कबूल केलं. तो मतलब अर्थात् पार पडलाच.

झुंजार० (हताश होऊन बसून) केवढा मूर्ख मी!

पिलाजी०—शिवाय, रमाजी सुद्धां आतां इतक्यात शुद्धीवर येऊन बोलला, कीं नारवरावानंच मला त्या

रात्रीं तुमच्याशीं तंटा करायला मांडिलं. त्या तंट्यामुळं आपण मला बरतर्फ केलं. आणखी म्हणाला कीं जाधवरावानंच माझ्या पोटांत तरवार खुपसलीन आणि त्याच्याच सांगण्यावरून मीं तुमच्यावर वार केला; इतकं म्हणून प्राण सोडलान्, धनीसाहेब.

धनाजी०—(झुंजाररावास) चला तुम्ही आतां आमच्या बरोबर; तुमचा हुद्दा अधिकार काढून घेतला आहे; आजपासून पिलाजीराव इथले सरलष्कर. (जाधवरावाकडे पहात पिलाजीस) आपण आतां या मांगाला हालहाल करून कुजवून मारायची एखादी शक्कल काढा. (झुंजाररावास) हुजूरच्या कानावर तुमच्या गुन्ह्याची खरी हकीगत जाईपर्यंत. तुम्ही आमच्या पक्क्या कैदेंत राहिलं पाहिजे; समजला! (शिपायास) चलारे यांना घेऊन. (ते पुढें येतात.)

झुंजार०—(धनाजीचे पाय हातांनीं धरून) जरा थांबा, आणि मी थोडं बोलतों तेवढं ऐकून घ्या. आजपर्यंत मीं गादीची काय नोकरी बजावली, ती हुजूर महशूर आहेच; त्याबद्दल काहीं सांगायला नको. पण हा सर्व प्रकार सरकारांच्या कानावर घालाल, तेव्हां माझी हकीगत काहीं कमजास्त न करतां सरळ बुद्धीनं जशी घडली तशी सांगा म्हणावं त्याचं बायकोवर अत्यंत प्रेम होतं; पण बेअक्कल! तो जरी इतका संशयखोर नव्हता, पण दुसऱ्यानं कान फुंकले म्हणजे शुद्ध वेडा होऊन जात असे; त्याच्या हातीं निर्मळ मुक्ताफळ सांपडलं असतां, मासळ्याप्रमाणं त्यानं तें फेकून दिलं; तसंच सांगा, कीं जन्मांत कधीं तो रडला नव्हता, पण या प्रसंगीं त्याच्या डोळ्याला असा काहीं पूर आला! शेवटीं असं कळवा, कीं मागं एकदा स्वारीवर

असतांना एका दुष्ट परदेशी जवानानं, वेणीपूरच्या एका मनुष्याला नाहक मारला, म्हणून त्या चोराची अशी मुंडी धरली, (चोहोंकडे पहात) आणि जंबिया चढवून त्या हरामखोराचा असा—(स्वतांस जंबिया मारून घेतो, व पडतां पडतां "लाडके, तुला मारण्यापूर्वी तुझं चुंबन जसं घेतलें होतं, तसंच स्वतांला मारतांनाही घेतों" असें म्हणून तिच्याजवळ पडून प्राण सोडतो.)

**धनाजी**०—(झुंजारराव कण्हत बोलत असतां धांदलींत) अहो! धरा! चोरला तें फुकट गेलं! हें मीं भाकीत केलंच होतं. (जाधवरावास) चिंता, क्षुधा आणि समुद्र यांच्यापेक्षांही तूं निर्दय आहेस—पहा हा दुःखाचा कहर! मांगा, तुझा प्रताप हा—(पिलाजीरावास) सरलष्करसाहेब, या काळसर्पाला, या बेरडाला काय कडक शिक्षा द्यायची तें आपण ठरवा. कुजत कुजत मेला पाहिजे हा! हर हर! बघवत नाहीं इकडे, झांकून तरी टाका.

(पडदा पडतो.)

